महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण- २०१६
आणि त्याअंतर्गत FAB प्रकल्पाकरिता प्रोत्साहने

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मइधो-२०१४/(प्र.क्र.११८)/उद्योग-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ एप्रिल, २०१६

**प्रस्तावना :-**

इलेक्ट्रॉनिक्स उद्योग हा भारतामध्ये झपाटयाने विकसित होणाऱ्या उद्योग क्षेत्रांपैकी एक उद्योग क्षेत्र आहे. विशेषत: माहिती तंत्रज्ञान, ग्राहकोपयोगी इलेक्ट्रॉनिक्स साधने आणि दूरसंचार या क्षेत्रातील वाढ ही इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राच्या वाढीस चालना देणारी ठरली आहे. या उद्योगाची सन २०१० पासून ते २०१५ पर्यंत CAGR (Compounded Annual Growth Rate) मध्ये ९.८% याप्रमाणे वृध्दी झाली आहे. ही वृध्दी सन २०१५ पर्यंत ९४२०.०० कोटी अमेरिकन डॉलर इतकी असेल आणि सन २०२० पर्यंत ती ४०,०००.०० कोटी अमेरिकन डॉलर पर्यंत जाईल. महाराष्ट्राकरिता याचा पूरेपूर वापर करून घेण्यासाठी तातडीने उपाययोजना करण्याची गरज आहे.

सद्य:स्थितीत देशामध्ये इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग (ESDM) म्हणजेच इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांच्या मागणीची पूर्तता करण्यासाठी केल्या जाणाऱ्या आयातीचा वाटा ६५% इतका आहे. आयातीवर असणारे इतक्या मोठया प्रमाणातील परावलंबित्व ही चिंतेची बाब असून हे चित्र न बदलल्यास इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांचा आयात खर्च हा लवकरच पेट्रोलियम उत्पादनांच्या आयात खर्चाला मागे टाकेल. आयातीवर असणारे अवलंबित्व कमी करणे आणि इलेक्ट्रॉनिक्स उद्योगात दडलेल्या सामर्थ्याचा लाभ घेण्याच्या उद्देशाने भारत सरकारने या क्षेत्रास चालना देण्यासाठी पुढाकार घेऊन प्रयत्न सुरु केले आहेत. यासाठी भारत सरकारने सन २०१६-१७ पर्यंत इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांच्या आयातीचे प्रमाण सध्याच्या ६५ टक्क्यांवरुन ५० टक्के एवढे कमी करण्याचे लक्ष्य निर्धारीत केले आहे. देशांतर्गत होणाऱ्या उत्पादनाच्या या वाढीमुळे या क्षेत्रात १५०० कोटी अमेरिकन डॉलर्स इतकी अधिकची गुंतवणूक होणे अंदाजित आहे. याबरोबरच सुमारे २७.८ दशलक्ष इतका रोजगार (जो सध्या २ दशलक्ष आहे) निर्माण होईल. तसेच इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राचा देशाच्या GDP मधील वाटा १०% इतका होईल. जे सध्याच्या ४% च्या दुप्पटीपेक्षा जास्त असेल.

मागणी व पुरवठयातील या मोठया दरीमुळे जगातील इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनकर्ते भारतामध्ये उत्पादन करण्यासाठी कारखाने स्थापित करणेबाबत स्वारस्य दाखवित आहेत. महाराष्ट्र राज्यातही इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रासाठी विशेष धोरण आखण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. महाराष्ट्र राज्यात उद्योगांसाठी असणारे पोषक वातावरण, उत्पादनासाठी आवश्यक असणारे कौशल्य, माहिती तंत्रज्ञान उद्योगासाठी अनुकूल स्थिती आणि उपलब्ध असणारे कुशल मनुष्यबळ या बाबी पाहता इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रातून लाभ प्राप्त करण्यासाठी राज्यास विशेष संधी आहे.

या पार्श्वभूमीवर राज्यात नवीन इलेक्ट्रॉनिक्स धोरणाचा मसुदा तयार करण्याबाबत विविध औद्योगिक संघटना तसेच उद्योग प्रतिनिधी व क्षेत्रीय अधिकारी यांचेकडून अभिप्राय मागविण्यात आले

आहेत. त्याप्रमाणे उद्योग संघटना, उद्योग प्रतिनिधी/ उद्योजक, लोकप्रतिनिधी यांचेबरोबर बैठका आयोजित करुन उद्योग घटकांना येणाऱ्या अडीअडचणी व शासनाकडून त्यांच्या असणाऱ्या अपेक्षा जाणून घेण्यात आल्या त्यानुसार राज्य इलेक्ट्रॉनिक्स धोरणाचा सर्वसमावेशक मसुदा प्रथमच तयार करण्यात आला होता. सदर धोरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राच्या विकासासाठी व या उद्योगांना अनुकूल ठरेल असे राज्याचे इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनासाठी स्वतंत्र धोरण आखणे आवश्यक असल्याने, महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक धोरण-२०१६ **आणि** त्याअंतर्गत FAB प्रकल्पांकरिता प्रोत्साहने या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येत आहे. सदर धोरणाची प्रत (परिशिष्ट-२ / २अ तसेच परिशिष्ट-३) या शासन निर्णयासोबत संलग्न असून, त्यातील खालील बाबींना विवक्षितपणे या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**२. महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक धोरण-२०१६ ची उद्दिष्टे व लक्षांक :-**

२.१ महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक धोरण-२०१६ ची उद्दिष्टे

१) गुंतवणूकदारांना गुंतवणूक करण्याकरिता अनुकूल वातावरण निर्माण करून राज्यात, इलेक्ट्रॉनिक्स वस्तूंचे उत्पादन करण्यास चालना देणे.

२) राज्यातील इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राची रचना व अभियांत्रिकी यामध्ये नवनवीन बदल करून राज्यात संशोधन व विकास प्रणाली निर्माण करून इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राचा शाश्वत विकास करण्यास सक्रीयपणे सहाय्य करणे.

३) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग या क्षेत्राशी संबंधित कौशल्यवृध्दी व प्रशिक्षण कार्यक्रम हाती घेणे.

४) राज्यात इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग घटक स्थापन करण्यासाठी एक खिडकी योजना सुरू करणे व संदर्भात क्षमताधिष्ठित (Potential) गुंतवणूकदारांना सामना करावा लागणाऱ्या समस्यांचे सर्वतोपरी निराकरण करुन त्यांना जमीन, ऊर्जा, पाणी इत्यादींसारख्या आवश्यक पायाभूत सेवा-सुविधा उपलब्ध करून देणे.

५) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्राकरिता कुशल मनुष्यबळाची उपलब्धता वाढविण्यासाठी या क्षेत्राशी निगडीत असलेल्या औद्योगिक हितसंबंधितांच्या सक्रिय सहयोगाने या क्षेत्रात प्रभावी पावले उचलण्यासाठी पुढाकार घेणे.

६) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग व नॅनो इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रातील संशोधन व विकासासाठी अधिकाधिक निधी उपलब्ध करून इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रात बौध्दिक मालमत्ता निर्मितीस चालना देणे.

७) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रातील विनिर्दिष्ट गरजा भागविण्याकरिता शासनांतर्गत विशेष शासन व्यवस्था निर्माण करणे.

८) केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या निदेशानुसार शास्त्रोक्त पद्धतीचा वापर करुन या उद्योगामुळे निर्माण होणा-या इ-कचऱ्याची विल्हेवाट व व्यवस्थापन करण्यासाठी अत्युत्तम पध्दती (Best Practices) अंगीकृत करण्यास गती देणे.

## २.२ महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण २०१६ चे लक्ष्यांक :

महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरणाचे लक्ष पुढील ५ वर्षापर्यंत - गाठण्यासाठी खालील लक्ष्य निश्चित करण्यात आले आहे.

अ) २०२० पर्यंत ३०० कोटी डॉलर्स इतक्या गुंतवणुकीसह १२०० कोटी डॉलर्स इतक्या उलाढालीचे लक्ष्य ठेवून जागतिक स्तरावर इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगाकरिता सर्वमान्य हब (HUB) म्हणून महाराष्ट्राची ओळख निर्माण करणे व या क्षेत्रात १ लाख अतिरिक्त रोजगार निर्माण करणे.

ब) २०२० पर्यंत इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रातील आयातीतील पर्याय २०० कोटी डॉलर्स पर्यंत वाढविणे.

## ३. धोरणाची व्याप्ती :-

या धोरणा अंतर्गत देण्यात येणारी प्रोत्साहने/फायदे राज्यातील सर्व भागातील उद्योगांना देय असतील. सामुहिक प्रोत्साहन योजना - २०१३ अंतर्गत प्रोत्साहने देय करण्याकरीता निश्चित करण्यात आलेली वर्गवारी या धोरणा करीता पण अवलंबण्यात येईल. केंद्र शासनाच्या इलेक्ट्रॉनिक्स आणि माहिती तंत्रज्ञान विभागाच्या Modified Special Incentive Package Scheme (M-SIPS) अंतर्गत प्रोत्साहने ज्या घटकांना मंजूर केली असतील त्यांना या प्रस्तुत योजनेअंतर्गत प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील **तसेच** ज्या घटकांना M-SIPS अंतर्गत यापूर्वी प्रोत्साहने मंजूर केली असतील त्यांना उर्वरित कालावधीसाठी प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील.

ज्या घटकांना M-SIPS अंतर्गत प्रोत्साहने केंद्र शासनाकडून मंजूर झाली नसतील अशा घटकांना राज्याचे विद्यमान औद्योगिक धोरण-२०१३ अंतर्गत नियमित प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील.

४. महाराष्ट्राच्या इलेक्ट्रॉनिक धोरणाचे उद्दिष्ट व त्याअनुषंगिक लक्ष्य गाठण्यासाठी पुढील कार्यतंत्र (Strategies) आखण्यास व इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्राकरिता खालील माध्यमातून जागतिक स्तरावर स्पर्धा करण्यास सक्षम बनविण्यासाठी वातावरण निर्मीती करण्यास आणि त्यासाठी आर्थिक (Fiscal) आणि अन्य सवलतीं देण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

### ४.१ प्रोत्साहने

१) आर्थिक प्रोत्साहन देणे,

२) लिथियम आयन बॅटरी, एल.इ.डी. इत्यादी सारख्या प्रकल्पांची उभारणी करण्याकरिता सुविधा निर्माण करुन देणे.

३) कर प्रणालीमध्ये सुसूत्रीकरण करून उद्योगाभिमुख स्थिर करप्रणाली प्रस्थापित करणे.

४) तंत्रज्ञानाचे हस्तांतरण, संशोधन व विकास आणि बौध्दिक मालमत्ता हक्क निर्मीती यास प्रोत्साहन देणे.

५) पुरवठादार आणि विक्रेते आणि यांच्यातील संपर्क व्यवस्था विकसित करणाऱ्या औद्योगिक संस्था/ संघटनांना प्रोत्साहन देण्यात येईल.

६) आठवडाभर चोवीस तास (२४X७) अंखडीतपणे वीज उपलब्ध करून देण्यात येईल.

७) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रासाठी इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी निर्माण करण्यात येईल.

४.२ याशिवाय खालील बाबींना सोबतच्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे विविक्षितपणे मान्यता देण्यात येत आहे.

अ) मनुष्यबळ विकास

ब) उबवणी केंद्र (इन्क्युबेशन सेंटर्स / उत्पादन केंद्र )

क) ई-कचरा व्यवस्थापन

४.३ शासनाकडून इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राला देण्यात येणारे महत्व स्प्ष्ट करणाऱ्या राज्य शासनाच्या प्रोत्साहक योजनांना प्रसिध्दी देण्यासाठी व त्याव्दारे राज्यात या क्षेत्रातील गुंतवणूकीस आकर्षित करण्यासाठी इलेक्ट्रॉनिक्स उद्योगांचे यथोचित प्रतिनिधीत्व असलेली मा. मंत्री (उद्योग) यांचे अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समिती गठीत करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. या समितीतील अशासकीय सदस्यांच्या बाबत यथावकाश स्वतंत्रपणे शासन आदेश निर्गमित केला जाईल.

| | | |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (उद्योग) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (उद्योग), | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (ऊर्जा ), | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१) | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान | सदस्य |
| ८ | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय | सदस्य |
| ९ | उप सचिव (उद्योग) उ.ऊ.व का.वि | सदस्य सचिव |

## ५. इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रातील गुंतवणूकदारांसाठी पुढीलप्रमाणे प्रोत्साहने देय राहतील :-

अ) पात्र इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना आर्थिक प्रोत्साहने सामुहिक प्रोत्साहन योजनेचे लेखा शिर्षा अंतर्गत देय होतील राज्यातील सर्व क्षेत्रातील पात्र सुक्ष्म, लघु, मध्यम व मोठ्या उत्पादक औद्योगिक उपक्रमांना पुढील परि. ६.(i) ते परि. ६.(iii) मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकत्रित सवलती (Basket of incentives) अनुज्ञेय असतील. या एकत्रित सवलतींची एकूण मर्यादा स्थिर भांडवली गुंतवणुकीच्या १०० टक्के किंवा १० वर्षाच्या पात्रता कालावधीएवढी असेल. परिच्छेद ६.(iv) ते ६.(vi)अंतर्गत नमूद प्रोत्साहने एकत्रित सवलती शिवाय अधिकची असतील.

ब) किमान रु.२५०.०० कोटींइतकी स्थिर भांडवली गुंतवणूक असलेल्या किंवा किमान ५०० व्यक्तींना रोजगार मिळवून देणाऱ्या अ, आणि ब प्रवर्ग क्षेत्रामधील आणि रु.१००.०० कोटीइतकी किमान स्थिर भांडवली गुंतवणूक असलेल्या किंवा २५० व्यक्तींना रोजगार मिळवून देणाऱ्या राज्यातील इतर क्षेत्रांमधील इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) दर्जा देण्यात येईल. या विशाल प्रकल्पांना द्यावयाची-उद्योग ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र. PSI-२०१३/CR-५४/Ind-८, दिनांक ०१ एप्रिल, २०१३ आणि तद्नंतर निर्गमित शासन निर्णय किंवा मंत्रीमंडळ उपसमिती किंचा उच्चाधिकार समितीच्या निर्णयावर आधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार ठरविण्यात येतील.

इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांकरिता अनुज्ञेय प्रोत्साहन कालावधी "admissible Incentives Period" अस्तित्वात असलेल्या सामूहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत पात्र कालावधीपेक्षा राज्याच्या A आणि B क्षेत्रात ३ वर्षानी तर इतर क्षेत्रात ५ वर्षांनी वाढविण्यात येईल.

या धोरणांतर्गत देय करण्यात आलेली प्रोत्साहने ही केंद्र शासनातर्फे किंवा त्यांच्या कोणत्याही यंत्रणेमार्फत किंवा स्थानिक प्राधिकरणामार्फत देय करण्यात आलेल्या प्रोत्साहनाशिवाय असतील.

६. <u>आर्थिक प्रोत्साहने</u> :-

i) **औद्योगिक विकास अनुदान** (IPS)

राज्यातील पात्र सुक्ष्म, लघु, मध्यम व मोठ्या औद्योगिक उपक्रमांना त्यांनी उत्पादित केलेल्या पात्र उत्पादनावर A आणि B वर्गवारी क्षेत्रात स्थानिक विक्रीवरील मुल्यवर्धित कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट (ITC) किंवा शुन्य यापैकी जे अधिक असेल ते अधिक देय केंद्रिय विक्रीकर अधिक ७५ टक्के इनपुट टॅक्स क्रेडीट) इतके तसेच राज्याच्या इतर क्षेत्रात (स्थानिक विक्रीवरील मुल्यवर्धित कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट किंवा शुन्य यापैकी जे अधिक असेल ते अधिक देय केंद्रीय विक्रीकर अधिक १०० टक्के इनपुट टॅक्स क्रेडीट) इतके औद्योगिक विकास अनुदान दरवर्षी देय असेल.

**टिप-** मूल्यवर्धित कर (VAT) व केंद्रीय विक्रीकर (CST) संबंधित अनुदान वितरीत करण्याची पध्दत, राज्यामध्ये GST लागू झाल्यानंतर त्याप्रमाणे सुधारित केली जाईल.

ii) **व्याज अनुदान**

सर्व नवीन / विस्तारीत उत्पादक घटक पात्र प्रकल्पांमधील स्थिर मालमत्ता खरेदीसाठी बँकेकडून/सार्वजनिक वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या मुदत कर्जावर व्याज अनुदान मिळण्यास पात्र असतील. याकरीता बँकेचा प्राईम लेंडींग रेट किंवा प्रत्यक्ष आकारलेला व्याज दर वजा दंड व्याज (असल्यास) यापैकी जो कमी असेल तो वास्तविक व्याज दर समजण्यात येईल.

वास्तविक व्याज दरातून घटकाला केंद्र शासनाच्या कोणत्याही योजनेअंतर्गत मिळणारे व्याज अनुदान वजा करुन उर्वरीत व्याज दराएवढे किंवा जास्तीत जास्त ५ टक्के यापैकी जे कमी असेल त्या एवढे व्याज अनुदान देय असेल. परंतु कमीत कमी दरसाल ७ टक्के व्याज उद्योग घटकाने स्वत: भरणे अनिवार्य असेल.

सदर व्याज रकमेची मर्यादा सदर वर्षी भरण्यात आलेल्या मूल्यवर्धित कर + CST पोटी प्राप्त रकमे एवढी असेल. "अ" आणि "ब" प्रवर्ग क्षेत्रातील ज्या पात्र सुक्ष्म, लघु, मध्यम व मोठ्या औद्योगिक उपक्रम घटकांमध्ये स्थायी कामगारांची संख्या १००० हून अधिक असेल तसेच इतर प्रवर्ग क्षेत्रातील ज्या घटकांमध्ये स्थायी कामगारांची संख्या ५०० हून अधिक असेल अशा घटकांना अनुज्ञेय व्याज अनुदानाच्या ५० % हून अधिक व्याज अनुदान दिले जाईल.

iii) **वीज आकार अनुदान (पॉवरटेरीफ सबसिडी)**

पात्र नवीन इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांना A आणि B वर्गवारी क्षेत्रात तीन वर्षांकरीता आणि राज्याच्या इतर क्षेत्रात ५ वर्षाकरीता प्रती युनिट रु. १/- प्रमाणे परिच्छेद ८.८ प्रमाणे नमुद मर्यादेत राहून वीज आकार अनुदान मिळण्यास पात्र असतील.

iv) **वीज शुल्कातून सूट**

पात्र नवीन इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांना १५ वर्षांसाठी वीज शुल्क भरण्यातून सूट देण्यात येईल.

v) **मुद्रांक शुल्क माफी**

उद्योग विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून माफीबाबत ना-हरकत प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून पात्र इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांना गुंतवणूक कालावधीत जमीन संपादन करण्यासाठी व मुदत कर्जासाठी मुद्रांक शुल्क भरण्यातून सूट देण्यात येईल.

vi) **पात्र सूक्ष्म, लघु, आणि मध्यम औद्योगिक उपक्रम यांच्या बळकटी करणाकरिता एक वेळेस द्यावयाची प्रोत्साहने**

अ) तंत्रज्ञानाचा दर्जा उंचावण्यासाठी लागणाऱ्या भांडवली उपकरणांवर २५% अनुदान, रु.२५.०० लाखाच्या मर्यादेत.

ब) उत्पादन प्रदूषणमुक्त करण्याकरीता लागणाऱ्या भांडवली उपकरणांवर २५% अनुदान, रु. ५.०० लाखाचे मर्यादेत.

क) पेटंट रजिस्ट्रेशन खर्चावर ७५% अनुदान, देशांतर्गत पेटंटसाठी रु १०.०० लाखाचे मर्यादेत तर आंतरराष्ट्रीय पेटंटकरिता रु. २५.०० लाखाचे मर्यादेत.

ड) औद्योगिक गुणवत्ता प्रमाणनाच्या किंमतीच्या ५०% दराने जास्तीत जास्त तीन प्रमाणित गुणवत्ता प्रमाणपत्र घेण्याकरिता ५ वर्षाचे काळात रु. ६.०० लाखाचे मर्यादेत अर्थसहाय्य देण्यात येईल. यासाठीच्या अर्थसहाय्याच्या रकमेत, प्रमाणन अभिकरणाने आकारलेले शुल्क, सल्ला देण्यासाठी आकारलेले शुल्क प्रशिक्षण शुल्क, बी आय एस (BIS) ने सुचविल्याप्रमाणे चाचणी उपकरणांचा खर्च, उपकरणांच्या अचूकता निश्चित करण्याचे (कॅलिब्रेशन) शुल्क यांचा बाबींचा समावेश असेल.

vii) **सूक्ष्म, लघु, मध्यम औद्योगिक उपक्रमांच्या पतपात्रता निर्धारणासाठी (क्रेडिट रेटिंग) एक वेळेस द्यावयाची प्रोत्साहने**

भारतीय लघुउद्योग विकास बँक (SIDBI) / शासनाच्या अधिकृत पतपात्रता निर्धारण अभिकरणाने (Government Accredited Credit Rating Agency) केलेल्या पत पात्रता निर्धारण खर्चाच्या ७५ टक्के आणि रु. ५०,०००/- मर्यादेत प्रोत्साहनात्मक रक्कम देण्यात येईल.

viii) सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम (MSME) आणि मोठे उपक्रम (LE) यांना प्रतिवर्षी, परिच्छेद ६.१ ते ६.४ मध्ये नमुद एकत्रित सवलती (Basket of Incentives) अंतर्गत देय अनुदानाची रक्कम ही, एकूण मंजूर एकत्रित सवलतींच्या १/१० या मर्यादेत असेल. मात्र प्रत्यक्ष त्यावर्षी मंजूर झालेली रक्कम आणि दरवर्षी वितरीत करावयाच्या रकमेची मर्यादा यातील फरकाची रक्कम पुढे देय (Carry Forward) करण्याची तरतूद करण्यात येईल.

जर विशाल उपक्रम आणि अति विशाल उपक्रम यांचा पात्रता कालावधी १० वर्षांपेक्षा जास्त असेल तर प्रत्येक वर्षी वितरीत करावयाच्या रकमेची मर्यादा ही एकूण देय अनुदानाची रक्कम आणि पात्रता कालावधी नुसार वर्षाची संख्या यांच्या भागाकाराएवढी असेल. मात्र प्रत्यक्ष त्या वर्षी मंजूर झालेली रक्कम आणि दरवर्षी वितरीत करावयाच्या रकमेची मर्यादा यातील फरकाची रक्कम पुढे देय (carry forward) करण्याची तरतूद असेल.

ix) सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकाकरिता पात्रता कालावधीनंतर कार्यकालावधी असणार नाही. अस्तित्वातील इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना या धोरणांच्या तरतुदींचा अंतर्गत त्यांच्या विस्तारीकरणांतर्गत लाभ घेण्याकरिता अस्तित्वातील एकूण स्थिर भांडवली गुंतवणुकीपेक्षा [Fixed Capital Investment (FCI)] कमीत कमी २५ टक्के अधिक अतिरिक्त स्थिर भांडवली गुंतवणूक करणे आवश्यक राहील. आणि सदर विस्तारीकरणाच्या संदर्भात होणाऱ्या अतिरिक्त स्थिर भांडवली गुंतवणूकीमुळे अस्तित्वातील स्थापित क्षमतेमध्ये किमान २५ %

वृध्दी होणे अनिवार्य राहील किंवा अपर्यवेक्षीय श्रेणीच्या रोजगारामध्ये किमान १०% वृध्दी होणे अनिवार्य राहील.

x) घटकांना मालमत्ता कर भरण्यातून १० वर्षांसाठी सूट देण्यात येईल. सूट दिल्यानंतर असे प्रकल्प कालांतराने महानगरपालिका, नगरपरिषद क्षेत्रात समाविष्ट झाले तरी त्यांना मालमत्ता कर भरण्यातून देण्यात येणारी १० वर्षांसाठीची सूट कायम राहील. राज्य शासन या संदर्भात स्थानिक प्राधिकरणाकरिता संबंधित सूचना निर्गमित करेल.

xi) माहितीचे आदान-प्रदान करण्यासाठी उपयोगात आणण्यात येणारे मोबाईल फोन, मोबाईल टॅबलेट्स यांसारखी इलेक्ट्रॉनिक्स उपकरणे, त्याचे सुटे भाग घटक व त्यांना लागणारी अन्य सहाय्यभूत उपकरणे मदरबोर्ड, राऊटर्स, मॉडेम, टॅबलेटस लॅपटॉप, सर्विलन्स कॅमेरा, नेटवर्कींग स्वीचेस व इतर नेटवर्कींग संबंधातील उपकरणे यांसारखी माहिती तंत्रज्ञान (आयटी) विषयक उत्पादने "विशेष महत्वपूर्ण उत्पादने" (Goods of Special Importance) म्हणून जाहीर करण्यात येतील आणि त्यावर सर्वात कमी दराचा मूल्यवर्धित कर (VAT) आकारण्यात येईल.

xii) लिथियम आयन बॅटरी, एल.इ.डी. (LED) टीएफटी उद्योग आणि इतर महत्वाचे क्षेत्र / उत्पादने राज्याव्दारे निश्चित करण्यात येऊन यांच्या उत्पादनासाठी एक स्वतंत्र गुंतवणूक अनुदान योजना सुरू केली जाईल. असे प्रस्ताव जेव्हा प्राप्त होतील त्यावेळी त्यावर सामूहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत गठित उच्चाधिकार समितीकडून (High Power Committee) निर्णय घेण्यात येईल.

xiii) भारत सरकारच्या इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुह योजनेअंतर्गत Electronics Manufacturing Cluster (EMC) यांना राज्य शासनाकडून खाली नमूद केल्याप्रमाणे अतिरिक्त प्रोत्साहने अनुज्ञेय असतील.

**एक)** ग्रीन फिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुहांना रू.५०.०० कोटी कमाल मर्यादेत प्रत्येक १०० एकर जमीनीमागे प्रकल्प मूल्याच्या ५० टक्के इतके अनुदान अर्थसहाय्याच्या रुपात देण्यात येते. या उद्योगांचे किमान अंशदान हे प्रकल्प मूल्याच्या २५ टक्के इतके असते. अशा प्रकारे भारत सरकारने मान्यता दिलेल्या ग्रीन फिल्ड उद्योग समुहांना, प्रकल्प मूल्याच्या १५ टक्के (अनुदानाद्वारे किंवा जमिनीद्वारे) प्रत्येक १०० एकर जमीनीमागे रु.१५.०० कोटीच्या मर्यादेपर्यंत अंशदान, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) क्षेत्रात महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ आणि इतर क्षेत्रात राज्य शासन देईल.

**दोन)** ब्राऊन फिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुहांना भारत सरकारकडून रू.५०.०० कोटी कमालमर्यादेत, प्रकल्प मूल्याच्या ७५ टक्के इतके अर्थसहाय्य दिले जाते यात उद्योगाचे किमान अंशदान हे, प्रकल्प मूल्याच्या १५ टक्के इतके असते. अशा प्रकारे भारत सरकारने मान्यता दिलेल्या अशा ब्राऊनफिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुहांना प्रकल्पमूल्याच्या १० टक्के, रू.१०.०० कोटी इतक्या मर्यादेपर्यंत अंशदान महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रात महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ आणि इतर राज्य शासन देईल.

**तीन)** संकल्पित इलेक्ट्रॉनिक्स उद्योग समुहाला आठवडाभर चोवीस तास अखंडीतपणे (२४ X ७) वीज पुरवठा त्याचे करीताच उभारलेल्या स्वतंत्र फीडरद्वारे देण्यात येईल.

## ७. <u>प्रणेता उद्योग (Anchor Unit) घटकाना प्रोत्साहीत करणे</u> :-

राज्यामध्ये इलेक्ट्रॉनिक्स उद्योगांसाठी पोषक वातावरण निर्माण होण्याच्या उद्देशाने राज्य शासनाने या क्षेत्रातील प्रणेता उद्योगांना प्रयत्नपूर्वक आकर्षित करण्यासाठी केंद्र शासनाद्वारे अधिसूचित केलेल्या इलेक्ट्रॉनिक्स उत्पादन उद्योग समुहातील पहिल्या दोन प्रणेता उद्योगांना (रु.१५० कोटीपेक्षा अधिक गुंतवणूक असणारे उद्योग) विशेष प्रोत्साहने प्रकरणनिहाय पडताळणी करुन दिली जातील. आणि देय प्रोत्साहने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय क्र.PSI-२०१३/(C.R.-५४)/Ind-८, दिनांक १ एप्रिल, २०१३ आणि तद्नंतर निर्गमित शासन निर्णय किंवा मंत्रीमंडळ उपसमिती किंवा उच्चाधिकार समितीच्या निर्णयावर आधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार असेल.

## ८ <u>अन्य प्रोत्साहने</u> :-

### i) संशोधन व विकास संस्थांना चाचणी केंद्र, उबवणे केंद्र ई. सहाय्य देणे

इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रात संशोधन व विकास कार्यास उत्तेजन देण्यासाठी राज्य शासनाच्या मान्यतेने उभारण्यात आलेल्या संशोधन व विकास संस्थांना त्यांच्या आवश्यकतेनुसार सहाय्य पुरविण्यात येईल.

नवीन आणि अस्तित्वात असलेल्या संशोधन व विकास संस्थांशिवाय यात चाचणीकरीता सुविधा, उबवणे केंद्रे (Incubation Centre) व नवोपक्रम केंद्रे ( Innovation Centres ) इत्यादींचा देखील समावेश असेल. जमीन व इमारत वगळून प्रकल्प मूल्याच्या ५० टक्के, जास्तीत जास्त रु.२५.०० कोटी इतके अर्थसहाय्य अशा संस्थांना देण्यात येईल.

ए.आय.सी.टी.इ. (AICTE) द्वारे मान्यता प्राप्त तंत्रज्ञान महाविद्यालये/ मान्यताप्राप्त संशोधन व विकास संस्था यांना अथवा कोणत्याही इलेक्ट्रॉनिक्स (ESDM) उद्योग / उद्योगाशी संबंधित औद्योगिक संघटना, कोणताही इलेक्ट्रॉनिक्स उद्योग घटक वा औद्योगिक संस्थाद्वारे कंत्राटी तत्वावर/ पुरस्कृत संशोधन कार्य दिल्यास, त्यांना

आर्थिक सहाय्यता म्हणून सदर प्रकल्पमूल्याच्या ५० टक्के आर्थिक सहाय्य, जास्तीत जास्त रु.५०.०० लाख मर्यादेपर्यन्त एक वेळेस देण्यात येईल.

ii) **बाजारपेठ विकासाकरिता मदत**

सुक्ष्म, लघु, मध्यम औद्योगिक उपक्रम घटकांना, भारताबाहेर आयोजित करण्यात येणाऱ्या इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांच्या आंतरराष्ट्रीय व्यापार प्रदर्शनामध्ये सहभागी होण्याकरिता भाडे, साहित्य व प्रदर्शित करावयाची सामग्रीच्या एकूण किंमतीच्या ५० टक्के वर्षातून एकदा जास्तीत जास्त रू. ३.०० लाख इतक्या मर्यादेपर्यंत एकूण धोरण कालावधीमध्ये दोन वेळेसाठी सहभागी होण्यास अर्थसहाय्य देण्यात येईल. सदर सहाय्य केलेल्या खर्चाच्या परताव्याच्या स्वरुपात असेल.

iii) भारताबाहेरील आंतरराष्ट्रीय प्रदर्शनामध्ये "महाराष्ट्र पॅव्हेलियन" म्हणून सहभागी होण्याकरिता कमीत कमी ५ औद्योगिक घटकांचा समावेश असलेल्या औद्योगिक संघटनांना यासाठीच्या एकूण भाडयाच्या ५० टक्के रू. १०.०० लाखांच्या कमाल मर्यादेपर्यंत इतक्या अर्थसहाय्य देण्यात येईल. असे अर्थसहाय्य खर्चाच्या परताव्याच्या स्वरुपात असेल व वर्षातून एकदाच दिले जाईल.

iv) औद्योगिक संघटनांना महाराष्ट्रात राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रे / प्रदर्शने आयोजित करण्याकरिता अनुक्रमे रु. १०.०० लाख व रु. २५.०० लाखाच्या मर्यादेत "व्हायेबिलीटी गॅप सपोर्ट" (Viability gap support) म्हणून अर्थसहाय्य करण्यात येईल.

v) औद्योगिक संघटनांना कन्व्हेंन्शन सेंटर / ट्रेड सेंटर उभारण्याकरीता जमिनीचे मूल्य वगळता, प्रकल्प खर्चाच्या ५० टक्के, रु. १०.०० कोटीच्या मर्यादेत अर्थसहाय्य देण्यात येईल.

## ९. इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी निर्माण करणे :-

राज्यात इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्राच्या विकासासाठी "इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी" राज्यशासनाकडून उभारण्यात येईल. या प्रयोजनासाठी रू. ५०.०० कोटी इतका प्रारंभिक मूळ निधी (कॉर्पस) उपलब्ध करुन देण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. हा निधी म्हणजे निधीचा निधी (Fund of Funds) असेल. या निधीची गुंतवणूक व्यवसायिक गुंतवणूकदार ( Professionally Managed) असलेल्या Early Stage Angel Funds आणि Venture Funds यांचेमार्फत करण्यात येईल.

## १०. कुशल मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे ( मनुष्यबळ विकास ) :-

i) औद्योगिक प्रशिक्षणसंस्था (ITI) / तंत्रज्ञान / व्यावसायिक शाळामध्ये सुयोग्य पायाभूत सुविधा निर्माण करुन, त्यांचा दर्जा उंचावून लोकांना ऑपरेटर स्तरावरील प्रशिक्षण देण्यात येईल.

ii) सार्वजनिक - खाजगी - भागीदारीच्या माध्यमातून इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांच्या विक्री नंतरच्या आधारभूत सेवा सुविधा देण्याविषयक अल्पमुदतीचे अभ्यासक्रम व प्रशिक्षण संस्था सुरू करण्यास उत्तेजन देण्यात येईल.

iii) तांत्रिक शिक्षण क्षेत्रात इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगक्षेत्रामध्ये आवश्यक असलेले अद्ययावत तंत्रज्ञानाचे शिक्षण देण्यासाठी क्षमता निर्माण करणे व त्यादृष्टीने तांत्रिक अभ्यासक्रम तयार करण्याची प्रक्रिया निरंतर सुरू ठेवण्यात येईल.

iv) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांच्या अंतर्गत (In house) प्रशिक्षण सुविधा बाहेरील उमेदवारांना प्रशिक्षण देण्याकरिता वापरण्यास परवानगी देण्यात येईल.

## ११. कायद्यांचे संबंधात सुलभीकरण करण्यासाठी पुढाकार :-

i) इलेक्ट्रॉनिक्स उद्योग घटकांना खालील बाबी संदर्भात सवलती मिळतील.

अ) कामाचे तास, कामाच्या पाळया आणि महिलांना नोकरीवर ठेवण्यासंदर्भातील दुकाने व आस्थापन संस्था अधिनियमांतील तरतुदी शिथिलता,

ब) प्रत्यक्ष हजेरी व वेतन विषयक अभिलेख नोंदवह्या ठेवण्यातून सूट,

क) कामगार विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १३ अधिनियमांखालील स्वयं-प्रमाणन आणि वार्षिक विवरणपत्रे एकत्रित दाखल करण्याचा पर्याय,

ii) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग (ESDM) हे महाराष्ट्र अत्यावश्यक सेवा आणि देखभाल कायदा २०११ या अधिनियमा अंतर्गत अत्यावश्यक सेवा म्हणून घोषित केले जातील. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांना अत्यावश्यक सेवांच्या यादीमध्ये समाविष्ट करण्याकरिता शासन सदर अधिनियमात योग्य ती सुधारणा करण्यात येईल.

iii) इलेक्ट्रॉनिक्स घटकांमधील कर्मचाऱ्यांशी संबंधीत कामगार कायद्यांद्वारे आवश्यक करण्यात आलेले अभिलेख इलेक्ट्रॉनिक स्वरूपात ठेवण्यास तरतुद करण्यात येईल. तसेच कामगार विभागाचे त्या दृष्टीने संगणकी- करण झाल्यास विवरणपत्रे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात स्विकारण्यात येतील.

iv) १०० पेक्षा कमी कर्मचारी असलेल्या आणि उत्पादन प्रक्रियेतून सांडपाणी प्रसृत न करणाऱ्या इलेक्ट्रॉनिक्स घटकांना महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडून मान्यता घेण्यापासून इलेक्ट्रॉनिक कचरा, वापरलेल्या बॅटऱ्या आणि उपयोगात आणलेले तेल यांसारख्या ई-कचऱ्याची विल्हेवाट लावल्याविषयी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाला वार्षिक विवरणपत्र सादर करणे आणि स्थानिक सांडपाणी व्यवस्थेशी जोडणी घेणे या अटींच्या अधीन राहून सूट देण्यात येईल.

अशा घटकांना, इलेक्ट्रॉनिक कचरा, वापरलेल्या बॅटऱ्या आणि उपयोगात आणलेले तेल यांसारख्या ई-कचऱ्याची विल्हेवाट लावल्याविषयी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाला वार्षिक

विवरणपत्र सादर करणे आवश्यक असेल. अशा उद्योग घटकांना स्थानिक सांडपाणी व्यवस्थेशी जोडणी घेणे आवश्यक राहील.

v) विशेष आर्थिक क्षेत्रातील (एसईझेड) घटकांसाठी कंत्राटी कामगार अधिनियमाअंतर्गत देण्यात आलेली शिथिलता विधानमंडळाच्या मंजुरीच्या अधीनतेने, सर्व इलेक्ट्रॉनिक्स घटकांनादेखील देण्यात येईल.

vi) विद्युत पुरवठा संदर्भात इलेक्ट्रॉनिक्स उद्योग हे अखंडीत प्रक्रिया उद्योग म्हणून समजले जातील व त्यांना स्वतंत्र फिडरद्वारे २४ तास आठवडाभर अखंडित वीज पुरवठा केला जाईल.

vii) इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांना राज्यशासनाच्या विविध विभागांच्या मान्यता मिळण्यासाठी एक खिडकी योजना सुरू करण्यात येईल.

**१२.** राज्य स्तरावरील, सामूहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत गठीत करण्यात आलेल्या समितीकडून या धोरणाची अंमलबजावणी / संनियंत्रण करण्यात येईल.

१३. <u>FAB प्रकल्पाकरिता प्रोत्साहने</u>

१३.१ इलेक्ट्रॉनिक हार्डवेअर उद्योगांची जननी असलेले FAB घटकांच्या वाढीसाठी विशेष प्रयत्न करणे आवश्यक आहे. सद्य:स्थितीत भारतामध्ये FAB उद्योग एकही नसल्याने, त्यासाठी योग्य ते धोरण आणि आर्थिक पाठिंबा इलेक्ट्रॉनिक्स धोरणामध्ये असणे आवश्यक आहे. सुरुवातीला या उत्पादक उद्योगांना बिजांकुरीत करण्यासाठी राज्य सरकारला काही खर्च करावा लागला, तरी गुंतवणूकीवर मिळणाऱ्या परताव्यामुळे राज्याच्या ढोबळ उत्पादनात भर पडेल म्हणून FAB चा महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक धोरणाचे अविभाज्य भाग म्हणून समावेश करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. याबाबत सविस्तर तपशील सोबत परिशिष्ट-३ म्हणून जोडली आहे.

**१३.२** FAB धोरणांतर्गत FAB घटकांना भांडवली खर्चावर आधारीत "भांडवली अनुदान" (Capital Subsidy ) द्यावयाची असल्याने त्या संदर्भात योजनांतर्गत (Planned) तरतूद करण्यास व स्वतंत्र लेखशीर्ष उघडणे ही प्रक्रिया करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

**१३.३** FAB घटकांना भांडवली अनुदान व इतर प्रोत्साहने पुढील अटी, शर्ती व पात्रता आणि कार्यपध्दतीच्या अधीन राहून अनुज्ञेय करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

**<u>भांडवली अनुदान</u> :-**

१३.३(१) सदर योजेनेकरिता जे घटक रु. ५००० कोटी आणि १० वर्षामध्ये कमीत कमी १०,००० कोटी गुंतवणूक करतील, असे मराठवाडा व विदर्भामध्ये स्थित होणारे घटकच फक्त सदर आर्थिक प्रोत्साहने मिळण्यास पात्र ठरतील.

१३.३(२) प्रकल्प खर्चाच्या १० टक्के भांडवली अनुदानाची प्रतिपुर्ती म्हणून वितरीत करावयाची रक्कम केंद्र शासनाच्या M-SIPS योजनेअंतर्गत वितरणाशी संलग्न करण्यात यावी. म्हणजेच केंद्र शासनाकडून M-SIPS योजनेअंतर्गत विहित केलेल्या अनुदानाचा टप्प्यानुसार घटकांस केंद्रिय अनुदान प्राप्त झाल्यानंतर राज्य शासनाने विहित केलेला पात्रता गुंतवणूकीचा टप्पा गाठल्यावर भांडवली अनुदान देय होईल. दरम्यान प्रस्तुत प्रकल्प गुंतवणूकीच्या आधारावर राज्य शासनाच्या सामुहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत विशाल व अतिविशाल प्रकल्प म्हणून गणले जातील व त्यांना त्यानुसार अनुज्ञेय प्रोत्साहने देण्यात येतील.

१३.३(३) प्रस्तावित धोरणातील तरतुदीनुसार FAB उत्पादक घटकाकडून किमान रुपये ५००० कोटीची गुंतवणूक झाल्यानंतर अनुज्ञेय भांडवली अनुदानाचा ५० टक्के अनुदान वितरीत करण्यात येईल. तथापि सदर अनुदानाची टक्केवारी केंद्रशासनाने वितरीत केलेल्या टक्केवारीशी सुसंगत प्रमाणात असेल.

१३.३(४) उर्वरित भांडवली अनुदान घटकाने रुपये १०,००० कोटीची गुंतवणूक केल्यानंतर वितरीत करण्यात येईल. तथापि सदर अनुदानाची टक्केवारी केंद्र शासनाने वितरीत केलेल्या टक्केवारीशी सुसंगत प्रमाणात असेल. तसेच रु. १०,००० कोटीपेक्षा जास्त गुंतवणूक झाल्यावर ५ टक्के पर्यंत अधिकचे भांडवली अनुदान देण्याच्या संदर्भात विशाल व अतिविशाल प्रकल्पासाठीची मंत्रीमंडळ उपसमिती निर्णय घेईल.

१३.३(५) Captive Vendorsकरिता २० टक्के पर्यंत गुंतवणूक भांडवली अनुदानाकरिता विचारात घेण्यात येईल. तसेच पात्र घटकांना ३० टक्के जमीन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून त्यांच्या प्रचलित धोरणानुसार आरक्षित ठेवण्यात येईल.

१३.३(६) गुंतवणूक कालावधी १० वर्षाचा असेल.

१३.३(७) केंद्र शासनाच्या M-SIPS योजनांतर्गत नमूद केलेल्या सर्व प्रकारच्या FAB घटकांना तसेच धोरण कालावधीत प्रस्थापित होणाऱ्या सर्व पात्र घटकांना या धोरणांतर्गत असलेली प्रोत्साहने अनुज्ञेय करण्यात येईल.

१३.३.(८) <u>**जमीन**</u>

i) महामंडळाच्या प्रचलित धोरणानुसार विदर्भ व मराठवाडयाच्या विकसित महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्रातील उद्योग घटकांना (पात्र उद्योग घटकांच्या आवश्यकतेनुसार) लगतची जमीन सवलतीच्या दरात (mutually agreed rate)उपलब्ध करुन देण्यात येईल.

ii) या धोरणांतर्गत पात्र उद्योग घटकांना उपलब्ध करुन देण्यात आलेली जमीन दीर्घकालीन भाडेतत्वावर (long term lease) राहील.

१३.३(९) **वीजेच्या बाबत प्रोत्साहने**

i) पात्र उद्योग घटकांना त्यांचे उत्पादन सुरु झाल्यापासून विद्युत शुल्कातून १५वर्षे कालावधीसाठी १०० टक्के सुट देण्यात येईल.

ii) राज्य शासन पात्र उद्योग घटकांना उत्पादन सुरु झाल्यापासून १५वर्षे कालावधीसाठी अखंडीत व पुरेसा वीज पुरवठा स्टेबल डबल ग्रीड फिक्स्ड कनेक्टीव्हीटी मधून उपलब्ध करुन देण्यात येईल.

१३.३(१०) **पाणी पुरवठयाबाबत प्रोत्साहने**

राज्य शासन पात्र उद्योग घटकांना अखंडीत व पुरेसा पाणी पुरवठा उपलब्ध करुन देण्यात येईल.

१३.३(११) **मुल्यवर्धीत कर/केंद्रीय विक्रीकर प्रोत्साहने**

i) पात्र उद्योग घटकांना, त्यांनी व्यावसायिक उत्पादन सुरु केल्याच्या तारखेपासून १५ वर्षांच्या कालावधीसाठी राज्यामध्ये विक्री केलेल्या उत्पादनासाठी अदा केलेल्या इनपूट टॅक्स क्रेडीटसह १०० टक्के मुल्यवर्धीत कराची प्रतिपूर्ती करण्यात येईल.

ii) पात्र उद्योग घटकांना, त्यांनी व्यावसायिक उत्पादन सुरु केल्याच्या तारखेपासून १५ वर्षांच्या कालावधीसाठी राज्याबाहेर विक्री केलेल्या उत्पादनासाठी अदा केलेले १०० टक्के केंद्रिय विक्रीकराची प्रतिपूर्ती करण्यात येईल.

iii) पात्र उद्योग घटकांना, विहीत कालावधीसाठी लागू असलेली वरील प्रोत्साहने सद्यस्थितीतील कर प्रणालीऐवजी वस्तू आणि सेवा कर कायदा लागू झाल्यानंतर सुधारीत करण्यात येतील.

१३.३(१२) **प्रशिक्षण व कौशल्य विकास प्रोत्साहने**

राज्य शासनाच्या कौशल्य विकास विभागाच्या धोरणानुसार फॅब उद्योग घटकांच्या कर्मचाऱ्यांचे अंतर्गत प्रशिक्षण व कौशल्य विकास खर्चास मदत करेल.

१३.३(१३) **मुद्रांक शुल्कामध्ये सूट**

i) पात्र उद्योग घटकांना उद्योग स्थापनेसाठी आवश्यक असलेली स्थावर मालमत्ता संपादन भाडे तत्त्वावर घेण्यासाठी मुद्रांक शुल्कामध्ये १००टक्के सूट अनुज्ञेय राहील .

ii) कर्ज घेण्यासाठी गहाण खत आणि हायपोथिकेशनसाठी मुद्रांक शुल्कामध्ये १००टक्के सूट अनुज्ञेय राहील.

१३.३ (१४) **महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून महामंडळाच्या प्रचलित धोरणानुसार पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी सुलभता (Facilitation) देण्यात येईल.**

i) डबल सर्किट ट्रान्समिशन ग्रीड कनेक्टीव्हीटीद्वारे २२०/४०० के.व्ही .सबस्टेशनमधून समर्पित अंखडित वीज पुरवठा फॅब घटकांपर्यंत उपलब्ध करुन देण्यास मदत (Facilitation) करण्यात येईल.

ii) धरणापासून ते फॅब घटकाच्या उंबरठयापर्यंत समर्पित पाईपलाईन आणि पाणी शुध्दीकरण केंद्र उपलब्ध करुन देण्यासाठी मदत (Facilitation) करण्यात येईल.

iii) औद्योगिक व सांडपाणी प्रक्रिया केंद्र आणि सांडपाणी वाहून नेण्यासाठी पुरेशा क्षमतेची पायाभूत सुविधा घटकापासून प्रक्रिया केंद्रापर्यंत पुरविण्याची सुविधा सुलभतेने मिळण्याकरिता मदत (Facilitation) करण्यात येईल.

iv) पावसाच्या पाण्याचा निचरा करण्यासाठी घटकांभोवती पावसाच्या पाण्याचे निचरा चारी /पाईप्सचे बांधकाम तसेच त्याची निगराणी करण्यासाठी मदत करण्यात येईल.

v) पात्र उद्योग घटकांच्या वाहतूक व लॉजिस्टीकच्या गरजा भागविण्यासाठी घटकापासून जवळच्या बंदरापर्यंत (पोर्ट) गुणवत्तापूर्ण रस्ते बांधण्यास मदत (Facilitation) करण्यात येईल.

vi) भारत सरकारच्या सहकार्याने औद्योगिक क्षेत्राजवळ देशांतर्गत कोरडे बंदराची (ड्राय पोर्ट) निर्मितीस (देशातंर्गत ठिकाणी समुद्र मार्गे आलेला माल वाहून नेण्यासाठी सुविधा म्हणून वापरण्यासाठी) मदत (Facilitation) करण्यात येईल.

vii) रासायनिक अग्निशमन क्षमतेचे समर्पित अग्निशमन केंद्र उभारण्यास मदत (Facilitation) करण्यात येईल

viii) पात्र फॅब उद्योग घटकाच्या कर्मचाऱ्यांसाठी घटकाच्या जवळपास गृहनिर्माण व सामाजिक पायाभूत सुविधा जसे आंतरराष्ट्रीय शाळा पुरविण्यास मदत (Facilitation) करण्यात येईल

१३.३(१५) धोरणामधील प्रोत्साहने राज्य शासनाच्या सामूहिक प्रोत्साहन योजना-२०१३ आणि केंद्र शासनाच्या आर्थिक अनुदानाव्यतिरिक्त राहतील.

**१४. <u>कालावधी :-</u>**

महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण-२०१६ हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे अस्तित्वात राहील.

**१५. या** शासन निर्णयानुसार सर्व संबंधीत विभागांनी परिशिष्ट-१ मध्ये दर्शविल्याप्रमाणे त्यांचेशी संबंधित विषयाबाबत आवश्यक ते आदेश/अधिसुचना त्वरीत निर्गमित कराव्यात.

१६. **सदर** शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६०४०७१०५११५८३७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Apurva Urvesh Chandra

Digitally signed by Apurva Urvesh Chandra
DN: c=IN, o=All India Services, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Apurva Urvesh Chandra
Date: 2016.04.30 17:53:17 +05'30'

( अपूर्व चंद्रा )
प्रधान सचिव (उद्योग )

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, (कौशल्य विकास व उद्योजकता विकास ), मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सचिव (मदतकार्य व पुर्नवसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई.
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१५. महानगरपालिका आयुक्त, महानगर पालिका (सर्व)
१६. संचालक, नगररचना व मूल्यनिर्धारण, पुणे,
१७. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई.
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विद्युत वितरण कंपनी (महावितरण), प्रकाशगड, वांद्रे ( पूर्व), मुंबई-४०० ०५१
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी (महापारेषण) प्रकाशगंगा, वांद्रे ( पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मीती (महानिर्मीती) प्रकाशगड, वांद्रे ( पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विकास अभिकरण, म्हाडा कमर्शिअल कॉम्पलेक्स, २ रा मजला, त्रिदल नगरच्या समोर, ऐरवडा, पुणे ४११ ००६.

२२. जिल्हाधिकारी (सर्व)
२३. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२४. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२५. महानिरीक्षक, नोंदणी व नियंत्रक, मुद्रांक शुल्क, पुणे.
२६. उप महानिरीक्षक, मुंद्रांक शुल्क, मुंबई.
२७. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
२८. मा. सभापती, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
२९. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
३०. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
३१. उद्योग विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी.
३२. कक्ष अधिकारी (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३३. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३४. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
३५. उप सचिव (उद्योग-२) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
३६. निवड नस्ती (उद्योग-२), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय क्रमांक मइधो-१९१४/(प्र.क्र.११८)/उद्योग-२, दिनांक ११ एप्रिल, २०१६ सोबतचे विवरणपत्र**

**परिशिष्ट -१**

| अ.क्र. | सोबतच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक | कार्यवाही विषय | कार्यवाही अपेक्षित संबंधित विभागाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | ४.२ (क) | ई -कचरा व्यवस्थापन | पर्यावरण विभाग |
| २ | ६(i) | औद्योगिक विकास अनुदान | विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय |
| | ६(ii) | व्याज अनुदान | |
| | ६(vi) | सूक्ष्म व लघु व मध्यम औद्योगिक उपक्रमाच्या बळकटी करणासाठी प्रोत्साहने | |
| | ८(ii) | बाजारपेठ विकास मदत | |
| | ८(iii) | आंतरराष्ट्रीय प्रदर्शनात भाग | |
| | ८(iv) | चर्चा सत्रे | |
| ३ | ६(xi) | विशेष महत्वपूर्ण उत्पादनांवर सर्वात कमी दराचा मूल्यवर्धित कर आकारणे. | वित्त विभाग |
| ४ | ६(iii) | वीज आकार अनुदान | ऊर्जा विभाग |
| | ६ (iv) | वीज शुल्कातून सूट | |
| | ६(xiii) तीन | इलेक्ट्रॉनिक उद्योग समूहाला २४ X ७ वीज पुरवठा फीडरव्दारे | |
| ५ | ६(v) | मुद्रांक शुल्क माफी | महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) |
| ६ | ६(x) | मालमत्ता करातून सूट | नगर विकास विभाग/ नवि-२ |
| ७ | ७ | प्रणेता उद्योग | उद्योग विभाग |
| | ८(i) | उबवणी केंद्रे / उत्पादन उद्याने | |
| | ८(v) | कन्व्हेन्शन सेंटर / ट्रेड सेंटर | |
| | ९ | इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी | |
| ८ | १० | मनुष्यबळाचा विकास करणे | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | ११(i) | अ) कामाचे तास, कामाच्या पाळया आणि महिलांना नोकरीवर ठेवण्यासंदर्भातील दुकाने व आस्थापन संस्था अधिनियमांतील तरतुदी शिथिलता,<br>ब) प्रत्यक्ष हजेरी व वेतन विषयक अभिलेख नोंदवह्या ठेवण्यातून सूट,<br>क) कामगार विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १३ अधिनियमां खालील स्वयं-प्रमाणन आणि वार्षिक विवरणपत्रे एकत्रित दाखल करण्याचा पर्याय, | कामगार विभाग |
| | ११(iii) | इलेक्ट्रॉनिक अभिलेख | |
| १० | ११(ii) | ESDM महाराष्ट्र अत्यावश्यक सेवा आणि देखभाल कायदा-२०११ | सामान्य प्रशासन विभाग |
| ११ | | महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण-२०१६ साठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता सामूहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत रु ४० कोटीचा अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.. | वित्त विभाग व नियोजन विभाग |
| १२ | १३.२, १३.३ | FAB प्रकल्पाकरिता प्रोत्साहने | १)वित्त विभाग<br>२) नियोजन विभाग,<br>३)महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,<br>४)महसूल व वन विभाग,<br>५)कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,<br>६)ऊर्जा विभाग |

# परिशिष्ट-२

# Maharashtra Electronics Policy, 2016

## 1. Background

Electronics industry is one of the fastest growing industries in India, driven by growth in key sectors such as IT, consumer electronics, and telecom. The industry is expected to grow at a CAGR of 9.8 percent from 2010 till 2015 (at more than twice the growth rate of the global ESDM market) to reach USD 94.2 billion by 2015 and further to **USD 400 billion** by **2020**.[1] While demand increased across all sectors, high technology products, specifically electronic products registered significant growth.

Year wise revenue of ESDM sector's Product and Services Markets (USD billion)

| YEAR | PRODUCT MARKET | SERVICES MARKET | TOTAL ESDM MARKET |
|---|---|---|---|
| 2010 | 51.22 | 7.79 | 59.01 |
| 2011 | 55.45 | 9.15 | 64.61 |
| 2012 | 57.58 | 10.72 | 68.31 |
| 2013 | 63.53 | 12.08 | 75.61 |
| 2014 | 70.48 | 13.68 | 84.16 |
| 2015 | 78.74 | 15.46 | 94.20 |




Of the current demand for ESDM products, 65 percent is being met by imports. As it is, this import dependence is high and going forward the import bill from the electronics sector is projected to surpass that of the oil sector - an area of grave concern. This underlines both the need for import substitution and the immense opportunities posed by the sector to look at India as their next manufacturing destination and cater both to the domestic demand as well as act as an exports hub.

---

[1] DEITY Task force report

५. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगाच्या दृष्टीने एक अग्रेसर स्थान म्हणून महाराष्ट्र राज्य पुढे आणून जगभर त्याचे नाव प्रसिध्द होण्यावर लक्ष केन्द्रीत करणे.

**२.३ उद्दिष्टे**

१. २०२० पर्यंत जवळपास १ लक्ष लोकांसाठी या क्षेत्रातील रोजगाराच्या संधी निर्माण करून ३०० कोटी डॉलर्स इतक्या गुंतवणुकीसह १२०० कोटी डॉलर्स इतक्या उलाढालीचे लक्ष्य ठेवून इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगाकरिता जागतिक स्तरावर सर्वमान्य हब म्हणून महाराष्ट्राची ओळख निर्माण करणे.

२. २०२० पर्यंत इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रातील निर्यात २०० कोटी डॉलर्स इतकी करणे.

३. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्राकरिता कुशल मनुष्यबळाची उपलब्धता वाढविण्यासाठी या क्षेत्राशी निगडीत असलेल्या गुंतवणुकदारांच्या सक्रिय सहयोगाने या क्षेत्रात प्रभावी उपाययोजना करणे.

४. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग व नॅनो इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रातील संशोधन व विकासासाठी अधिकाधिक निधी उपलब्ध करून इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रात बौध्दिक मालमत्ता निर्मितीस चालना देणे.

५. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रातील विनिर्दिष्ट गरजा भागविण्याकरिता शासनांतर्गत विशेष विभाग/ शासन व्यवस्था निर्माण करणे.

६. या उद्योगामुळे निर्माण होणा-या ई-कचऱ्याचे व्यवस्थापन करण्यासाठी केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या निदेशानुसार शास्त्रोक्त पद्धतीचा वापर करुन त्याची विल्हेवाट लावणे.

**२.४ <u>धोरणाची वैधता</u>**

हे धोरण लागू झाल्यापासून ५ वर्षापर्यंत अंमलात राहील.

**२.५ <u>धोरणाची व्याप्ती</u>**

या धोरणा अंतर्गत देण्यात येणारी प्रोत्साहने/फायदे राज्यातील सर्व भागातील उद्योगांना देय असतील. केंद्र शासनाच्या इलेक्ट्रॉनिक्स आणि माहिती तंत्रज्ञान विभागाच्या Modified Special Incentive Package Scheme (M-SIPS) अंतर्गत प्रोत्साहने ज्या घटकांना मंजूर केली असतील त्यांना या प्रस्तुत योजनेअंतर्गत प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील. तसेच ज्या घटकांना M-SIPS अंतर्गत यापूर्वी प्रोत्साहने मंजूर केली असतील त्यांना उर्वरित कालावधीसाठी प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील.

ज्या घटकांना MSIPS अंतर्गत प्रोत्साहने केंद्र शासनाकडून मंजूर झाली नसतील अशा घटकांना राज्याचे विद्यमान औद्योगिक धोरण-२०१३ अंतर्गत नियमित प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील.

**३. कार्यतंत्र**

**३.१** इलेक्ट्रानिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्र ( ESDM) करिता खालील माध्यमातून जागतिक स्तरावर स्पर्धा करण्यास सक्षम बनविण्यासाठी वातावरण निर्मिती करण्यात येईल :-

१. आर्थिक प्रोत्साहन देणे,

२. लिथियम आयन बॅटरी, एल इ डी उत्पादन इत्यादी सारख्या प्रकल्पांची उभारणी करण्याकरिता सुविधा निर्माण करुन देणे

~~३.~~ कर प्रणालीमध्ये सुसूत्रीकरण करून उद्योगाभिमुख स्थिर करप्रणाली प्रस्थापित करणे,

४. तंत्रज्ञानाचे हस्तांतरण, संशोधन व विकास आणि बौध्दिक मालमत्ता हक्क निर्मिती यास प्रोत्साहन देणे,
५. पुरवठादार आणि विक्रेते यांच्यातील संपर्क व्यवस्था करणाऱ्या/ विकसित करणाऱ्या औद्योगिक संस्था / संघटनांना प्रोत्साहन देणे,
६. आठवडाभर चोवीस तास (२४ X ७) अखंडीत वीज उपलब्ध करून देणे,
७. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्रासाठी इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी निर्माण करणे.

### ३.२ निर्यातीस चालना देणे

१. निर्यातभिमुख उद्योग घटकांना प्रोत्साहने देणे.
२. जगातील इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रात अग्रेसर असलेल्या देशामधील विविध क्षेत्रांशी समन्वय साधणे व त्यांच्याशी संपर्क जोडण्यासाठी प्रोत्साहीत करणे आणि आघाडीवरील इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग कंपन्यांशी प्रतिबंध होऊन राज्यात गुंतवणूक करण्यास पुढाकार घेण्यासाठी निमंत्रित करणे.

### ३.३ मनुष्यबळ विकास

इलेक्ट्रॉनिक्स उत्पादन उद्योग स्पर्धाक्षम होण्यासाठी कुशल मनुष्यबळाची गरज असते. या क्षेत्राच्या गरजेप्रमाणे, कुशल मनुष्यबळ उपलब्ध होण्याकरीता राज्य शासन आवश्यकतेनुसार कौशल्य प्रशिक्षण देण्यावर भर देईल. यामध्ये पुढील बाबींचा समावेश असेल-

१. प्रशिक्षित व कुशल मनुष्यबळ उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने शैक्षणिक संस्थांत आवश्यकतेनुरुप अभ्यासक्रम तयार करणे.
२. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांशी निगडीत विविध विषयांशी संबंधित शिक्षकांचे ज्ञान विकसित करण्याकरिता संस्थात्मक यंत्रणा निर्माण करणे.

### ३.४ उबवणी केंद्रे (इनक्युबेशन सेंटर्स) / उत्पादन उद्याने

शैक्षणिक संस्था / इलेक्ट्रॉनिक्स उद्योग यांच्या सहयोगाने इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांशी संबंधित असलेल्या क्षेत्रांसाठी इनक्युबेशन सेंटर्स स्थापन करण्यास शासन प्रोत्साहन देईल. अशा इन्क्युबेशन केंद्राकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) अल्प किंमतीत पायाभूत सुविधा पुरवेल.

केंद्र शासनाच्या ग्रीनफिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उद्योग समुह योजने अंतर्गत इलेक्ट्रॉनिक्स उत्पादन उद्यान स्थापन करण्याकरीता औरंगाबाद येथे दिल्ली-मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर (DMIC) प्रकल्पा अंतर्गत १०० एकर पर्यन्त भूखंड आरक्षित ठेवण्यात येईल.

### ३.५ ई-कचरा व्यवस्थापन

इ- कचरा हाताळणी विषयक धोरण पर्यावरणाकुल असावे यासाठी धोकादायक घटकांचा वापर करण्यावरील निर्बंधासह इ-कचरा (व्यवस्थापन व हाताळणी ) नियम, २०११ ची अंमलबजावणी करण्यास या क्षेत्रातील उद्योगांच्या सहकार्याने पर्यावरणपूरक यंत्रणा निर्माण करणे.

**३.६** शासनाकडून इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्राला देण्यात येणारे महत्व स्पष्ट करणाऱ्या राज्य शासनाच्या प्रोत्साहक योजनेअंतर्गत प्रसिध्दी देण्यासाठी व त्याद्वारे राज्यात या क्षेत्रातील गुंतवणुकीस आकर्षित करण्यासाठी इलेक्ट्रॉनिक्स उद्योगांचे यथोचित प्रतिनिधित्व असलेली उच्चस्तरीय समिती गठीत करणे.

* **या क्षेत्रातील गुंतवणूकदारांसाठी प्रस्तावित विनिर्दिष्ट प्रोत्साहने.**

## ४. आर्थिक प्रोत्साहने

पात्र इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना आर्थिक प्रोत्साहने सामुहिक प्रोत्साहन योजनेच्या धर्तीवर देय होतील. राज्यातील सर्व क्षेत्रातील पात्र सुक्ष्म, लघु , मध्यम व मोठ्या उत्पादक औद्योगिक उपक्रमांना ४.१ ते ४.३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकत्रित सवलती (Basket of Incentives) अनुज्ञेय असतील. या एकत्रित सवलतींची एकूण मर्यादा स्थीर भांडवली गुंतवणुकीच्या १०० टक्के किंवा १० वर्षाचा पात्रता कालावधी; जे आधी येईल, एवढी असेल. वरील एकत्रित सवलतीं व्यतिरिक्त अधिकची परिच्छेद ४.४ ते ४.६ अंतर्गत नमुद प्रोत्साहने मिळतील.

किमान रु.२५०.०० कोटींइतकी स्थिर भांडवली गुंतवणूक असलेल्या किंवा किमान ५०० व्यक्तींना रोजगार मिळवून देणाऱ्या अ आणि ब प्रवर्ग क्षेत्रामधील आणि रु.१००.०० कोटीइतकी किमान स्थिर भांडवली गुंतवणूक असलेल्या किंवा २५० व्यक्तींना रोजगार मिळवून देणाऱ्या राज्यातील इतर क्षेत्रांमधील इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) दर्जा देण्यात येईल. या विशाल प्रकल्पांना द्यावयाची प्रोत्साहने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र. PSI-२०१३/C.R.-५४/Ind-८, दिनांक १ एप्रिल, २०१३ आणि तद्नंतर निर्गमित शासन निर्णय किंवा मंत्रीमंडळ उपसमिती किंवा उच्चाधिकार समितीच्या निर्णयावर आधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार ठरविण्यात येतील.

इलेक्ट्रानिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांकरिता पात्र अनुज्ञेय प्रोत्साहन कालावधी (Incentives Period)अस्तित्वात असलेल्या सामुहिक प्रोत्साहन योजने अंतर्गत पात्र कालावधीपेक्षा राज्याच्या Aआणि B क्षेत्रात ३ वर्षांनी तर इतर क्षेत्रात ५ वर्षांनी वाढविण्यात येईल.

या धोरणांतर्गत देय करण्यात आलेली प्रोत्साहने ही केंद्र शासनातर्फे किंवा त्यांचे कोणत्याही यंत्रणेमार्फत किंवा स्थानिक प्राधिकरणामार्फत देय करण्यात आलेल्या प्रोत्साहना व्यतिरिक्त असतील.

### ४.१ औद्योगिक विकास अनुदान (IPS)

राज्यातील पात्र सुक्ष्म, लघु, मध्यम व मोठ्या औद्योगिक उपक्रमांना त्यांनी उत्पादित केलेल्या पात्र उत्पादनावर A आणि B वर्गवारी क्षेत्रात स्थानिक विक्रीवरील मुल्यवर्धित कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट (ITC) किंवा शुन्य यापैकी जे अधिक असेल ते अधिक देय केंद्रिय विक्रीकर अधिक ७५ टक्के इनपुट टॅक्स क्रेडीट) इतके तसेच राज्याच्या इतर क्षेत्रात स्थानिक विक्रीवरील मुल्यवर्धित कर वजा इनपुट टॅक्स क्रेडीट किंवा शुन्य यापैकी जे अधिक असेल ते अधिक देय केंद्रीय विक्रीकर अधिक १०० टक्के इनपुट टॅक्स क्रेडीट) इतके औद्योगिक विकास अनुदान दरवर्षी देय असेल.

**टिप-** मूल्यवर्धित कर (VAT) व केंद्रीय विक्रीकर (CST) संबंधित अनुदान वितरीत करण्याची पध्दत, राज्यामध्ये GST लागू झाल्यानंतर त्याप्रमाणे सुधारित केली जाईल.

### ४.२ व्याज अनुदान

सर्व नवीन / विस्तारीत उत्पादक घटक पात्र प्रकल्पामधील स्थीर मालमत्ता खरेदीसाठी बँकेकडून / सार्वजनिक वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या मुदत कर्जावर व्याज अनुदान मिळण्यास पात्र असतील याकरीता बँकेचा प्राईम लेंडींग रेट किंवा प्रत्यक्ष आकारलेला व्याज दर वजा दंड व्याज (असल्यास) यापैकी जो कमी असेल तो वास्तविक व्याज दर समजण्यात येईल.

वास्तविक व्याज दरातून घटकाला केंद्र शासनाच्या कोणत्याही योजनेअंतर्गत मिळणारे व्याज अनुदान वजा करुन उर्वरीत व्याज दराएवढे किंवा जास्तीत जास्त ५ टक्के यापैकी जे कमी असेल त्याएवढे व्याज अनुदान देय असेल, परंतू कमीत कमी दरसाल ७ टक्के व्याज उद्योग घटाकाने स्वत: भरणे अनिवार्य असेल. सदर व्याज रकमेची मर्यादा सदर वर्षी भरण्यात आलेल्या मूल्यवर्धित कर + CST पोटी प्राप्त रकमे एवढी असेल- 'अ' आणि 'ब' प्रवर्ग क्षेत्रातील ज्या पात्र सुक्ष्म, लघु, मध्यम व मोठ्या औद्योगिक उपक्रम घटकांमध्ये स्थायी कामगारांची संख्या १००० हून अधिक असेल तसेच इतर प्रवर्ग क्षेत्रातील ज्या घटकांमध्ये स्थायी कामगारांची संख्या ५०० हून अधिक असेल अशा घटकांना अनुज्ञेय व्याज अनुदानाच्या ५० % हून अधिक व्याज अनुदान दिले जाईल.

**४.३ वीज आकार अनुदान. (पॉवर टेरीफ सबसिडी)**

पात्र नवीन इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांना A आणि B वर्गवारी क्षेत्रात तीन वर्षांकरीता आणि राज्याच्या इतर क्षेत्रात ५ वर्षाकरीता प्रती युनिट रु. १/- प्रमाणे परिच्छेद ४.७ प्रमाणे नमुद मर्यादेच्या अधीन राहून वीज आकार अनुदान मिळण्यास पात्र असतील.

**४.४ वीज शुल्कातून सूट**

पात्र नवीन इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना १५ वर्षांसाठी वीज शुल्क भरण्यातून सूट देण्यात येईल.

**४.५ मुद्रांक शुल्क माफी**

**उद्योग विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून माफीबाबत ना-हरकत प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून** पात्र इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना गुंतवणूक कालावधीत जमीन संपादन करण्यासाठी व मुदत कर्जासाठी मुद्रांक शुल्क भरण्यातून सूट देण्यात येईल.

**४.६ सूक्ष्म, लघु आणि मध्यम औद्योगिक उपक्रम यांच्या बळकटीकरणासाठी प्रोत्साहने**

१. पात्र सूक्ष्म, लघु, आणि मध्यम औद्योगिक उपक्रमांना खालील प्रोत्साहने देय असतील :-

अ) तंत्रज्ञानाचा दर्जा उंचावण्यासाठी लागणाऱ्या भांडवली उपकरणांवर एक वेळेस २५ टक्के अनुदान, रु.२५.०० लाखाचे मर्यादेत.

ब) उत्पादन प्रदुषणमुक्त करण्याकरीता लागणाऱ्या भांडवली उपकरणांवर एक वेळेस २५ टक्के अनुदान, रु.५.०० लाखाचे मर्यादेत

क) पेटंट रजिस्ट्रेशन खर्चावर ७५ टक्के अनुदान, देशांतर्गत पेटंटसाठी रु.१०.०० लाखाचे मर्यादेत तर आंतरराष्ट्रीय पेटंटकरिता रु. २५.०० लाखाचे मर्यादेत

ड) औद्योगिक गुणवत्ता प्रमाणनाच्या किंमतीच्या ५०% दराने जास्तीत जास्त तीन प्रमाणित गुणवत्ता प्रमाणपत्र घेण्याकरिता ५ वर्षाचे काळात एकूण रु.६.०० लाखाचे मर्यादेत अर्थसहाय्य देण्यात येईल. यासाठीच्या अर्थसहाय्याच्या रकमेत, पुढील बाबींचा समावेश
करण्यात येईल.

एक) प्रमाणन अभिकरणाने आकारलेले शुल्क.

दोन) सल्ला देण्यासाठी आकारलेले शुल्क व प्रशिक्षण खर्च.

तीन) बी आय एस ने सुचविल्याप्रमाणे चाचणी उपकरणांचा खर्च.

चार) उपकरणांच्या अचूकता निश्चित करण्याचा (कॅलिब्रेशन) खर्च.

२. सुक्ष्म, लघु, मध्यम औद्योगिक उपक्रमांच्या पतपात्रता निर्धारणासाठी (क्रेडिट रेटिंग) एक वेळेस द्यावयाची प्रोत्साहने :-

रु. ५०,०००/- या मर्यादेत राहून, भारतीय लघुउद्योग विकास बँक (SIDBI) / शासनाच्या अधिकृत पतपात्रता निर्धारण अभिकरणाने (Government Accredited Credit Rating Agency) केलेल्या पतपात्रता निर्धारण खर्चाच्या ७५ टक्के इतकी प्रोत्साहनात्मक रक्कम देण्यात येईल.

**४.७** सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम (MSME) आणि मोठे उपक्रम (LE) यांना प्रतिवर्षी, परिच्छेद ४ मध्ये नमुद एकत्रित सवलती (Basket of Incentives) अंतर्गत देय अनुदानाची रक्कम ही, एकूण मंजूर एकत्रित सवलतींच्या १/१० या मर्यादेत असेल. मात्र प्रत्यक्ष त्यावर्षी मंजूर झालेली रक्कम आणि दरवर्षी वितरीत करावयाच्या रकमेची मर्यादा यातील फरकाची रक्कम पुढे देय (Carry Forward) करण्याची तरतूद असेल.

जर विशाल उपक्रम आणि अति विशाल उपक्रम यांचा पात्रता कालावधी १० वर्षांपेक्षा जास्त असेल तर प्रत्येक वर्षी वितरीत करावयाच्या रकमेची मर्यादा ही एकूण देय अनुदानाची रक्कम आणि पात्रता कालावधी नुसार वर्षाची संख्या यांच्या भागाकाराएवढी असेल. मात्र प्रत्यक्ष त्या वर्षी मंजूर झालेली रक्कम आणि दरवर्षी वितरीत करावयाच्या रकमेची मर्यादा यातील फरकाची रक्कम पुढे देय (carry forward) करण्याची तरतूद असेल.

**४.८** या धोरणा अंतर्गत इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकाकरिता पात्रता कालावधीनंतर कार्य कालावधी असणार नाही. अस्तित्वातील इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक घटकांना या धोरणाच्या तरतुदींचा त्यांच्या विस्तारीकरणांतर्गत लाभ घेण्याकरिता, अस्तित्वातील एकूण स्थिर भांडवली गुंतवणुकीपेक्षा 'Fixed Capital Investment' (FCI) कमीतकमी २५ टक्के अधिक अतिरीक्त स्थिर भांडवली गुंतवणूक करणे आवश्यक राहील आणि सदर विस्तारीकरणाच्या संदर्भात होणाऱ्या अतिरिक्त स्थिर भांडवली गुंतवणूकींमुळे अस्तित्वातील स्थापित क्षमतेत किमान २५% वृद्धी होणे अनिवार्य राहील. किंवा अपर्यवेक्षकिय श्रेणीच्या रोजगारा मध्ये किमान १०% वाढ होणे अनिवार्य राहील.

**४.९** घटकांना मालमत्ता कर भरण्यातून १० वर्षांसाठी सूट देण्यात येईल. सूट दिल्यानंतर असे प्रकल्प कालांतराने महानगरपालिका, नगरपरिषद यांच्या क्षेत्रात समाविष्ट झाले तरी त्यांना मालमत्ता कर भरण्यातून देण्यात येणारी १० वर्षांसाठीची सूट कायम राहील. राज्य शासन या संदर्भात स्थानिक प्राधिकरणाकरीता आवश्यक सूचना निर्गमित करेल.

**४.१०** माहितीचे आदान-प्रदान करण्यासाठी उपयोगात आणण्यात येणारी मोबाईल फोन, मोबाईल टॅबलेट्स यांसारखी इलेक्ट्रॉनिक्स उपकरणे, त्याचे सुटे भाग, घटक व त्यांना लागणारी अन्य साह्यभूत उपकरणे आणि मदरबोर्ड, राउटर्स, मॉडेम, टॅबलेट्स, लॅपटॉप, सर्व्हिलन्स कॅमेरा, नेटवर्कींग स्विचेस व इतर नेटवर्कींग संबंधातील उपकरणे यांसारखी माहिती तंत्रज्ञान (आयटी) विषयक उत्पादने "विशेष महत्वपूर्ण उत्पादने" म्हणून जाहीर करण्यात येतील आणि त्यावर अस्तित्वात असलेला सर्वात कमी दराचा मूल्यवर्धित कर (VAT) आकारण्यात येईल. यामुळे या इलेक्ट्रॉनिक्स उपकरणांची विक्री वाढण्याबरोबरच त्यांच्या विक्रीपश्चात त्या उपकरणांच्या अनुषंगाने लागणारी सेवा (Service) देणारे उद्योग महाराष्ट्रात स्थापित होण्यास मदत होईल.

**४.११** लिथियम आयएन बॅटरी, एल.ई.डी, टी.एफ.टी उद्योग आणि इतर महत्वाचे क्षेत्र / उत्पादने राज्याद्वारे निश्चित करण्यात येऊन त्यांच्या उत्पादकांसाठी, स्वतंत्र गुंतवणूक अनुदान योजना सुरु केली जाईल. असे प्रस्ताव जेव्हा प्राप्त होतील त्यावेळी त्यावर सामुहिक प्रोत्साहन योजनेच्या अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीकडून (High Power Committee) निर्णय घेण्यात येईल.

**४.१२** भारत सरकारच्या इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुह योजनेअंतर्गत Electronics Manufacturing Cluster (EMC) खालील प्रोत्साहने देण्यात येतील.

**एक)** ग्रीन फिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुहांना रू.५०.०० कोटी कमाल मर्यादेत प्रत्येक १०० एकर जमीनीमागे प्रकल्प मूल्याच्या ५० टक्के इतके अनुदान अर्थसहाय्याच्या रुपात देण्यात येते. या उद्योगांचे किमान अंशदान हे प्रकल्प मूल्याच्या २५ टक्के इतके असते. भारत सरकारने मान्यता दिलेल्या अशा ग्रीन फिल्ड उद्योग समुहांना, प्रकल्प मूल्याच्या १५ टक्के (अनुदानाद्वारे किंवा जमिनीद्वारे) प्रत्येक १०० एकर जमीनीमागे रु.१५.०० कोटीच्या मर्यादेपर्यंत अंशदान, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) क्षेत्रात महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ आणि इतर क्षेत्रात राज्यशासन देईल.

**दोन)** ब्राऊन फिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुहांना भारत सरकारकडून रू.५०.०० कोटी कमालमर्यादेत, प्रकल्प मूल्याच्या ७५ टक्के इतके अर्थसहाय्य दिले जाते यात उद्योगाचे किमान अंशदान हे, प्रकल्प मूल्याच्या १५ टक्के इतके असते. भारत सरकारने मान्यता दिलेल्या अशा ब्राऊनफिल्ड इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक उद्योग समुहांना प्रकल्पमूल्याच्या १० टक्के, रू.१०.०० कोटी इतक्या मर्यादेपर्यंत अंशदान महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रात महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ आणि इतर राज्य शासन देईल.

**तीन)** **संकल्पित** इलेक्ट्रॉनिक्स उद्योग समुहाला आठवडाभर चोवीस तास अखंडीतपणे (२४ X ७) वीज पुरवठा त्याचे करीताच उभारलेल्या स्वतंत्र फीडरद्वारे देण्यात येईल.

**४.१३ - प्रणेता उद्योग (Anchor Unit)**

राज्यामध्ये इलेक्ट्रॉनिक्स उद्योगांसाठी पोषक वातावरण निर्माण होण्याच्या उद्देशाने राज्य शासनाने या क्षेत्रातील प्रणेता उद्योगांना प्रयत्नपूर्वक आकर्षित करणे गरजेचे आहे. हे प्रणेता उद्योग या क्षेत्रात इतर उद्योगांना आकर्षित करतील आणि या प्रणेता उद्योगासभोवती सूक्ष्म, लघू व मध्यम (MSME) उपक्रम स्थापित होतील. केंद्र शासनाद्वारे अधिसूचित केलेल्या इलेक्ट्रॉनिक्स उत्पादन उद्योग समुहातील पहिल्या दोन प्रणेता उद्योगांना (रु.१५० कोटीपेक्षा अधिक गुंतवणूक असणारे उद्योग) विशेष प्रोत्साहने प्रकरणनिहाय पडताळणी करुन दिली जातील. आणि देय प्रोत्साहने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय क्र.PSI-२०१३/(C.R.-५४)/Ind-८, दिनांक १ एप्रिल, २०१३ आणि तद्नंतर निर्गमित शासन निर्णय किंवा मंत्रीमंडळ उपसमिती किंवा उच्चाधिकार समितीच्या निर्णयावर आधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार असतील.




## ५. अन्य प्रोत्साहने

**५.१ संशोधन व विकास संस्थांना सहाय्य** चाचणीकरीता सुविधा,/ उबवणे केंद्रे (Incubation Centre) व नवोपक्रम केंद्रे ( Innovation Centres )

इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रात संशोधन व विकास कार्यास उत्तेजन देण्यासाठी राज्य शासनाच्या मान्यतेने उभारण्यात आलेल्या संशोधन व विकास संस्थांना त्यांच्या आवश्यकतेनुसार सहाय्य पुरविण्यात येईल.

१. नवीन आणि अस्तित्वात असलेल्या संशोधन व विकास संस्थांशिवाय यात चाचणीकरीता सुविधा, उबवणे केंद्रे (Incubation Centre) व नवोपक्रम केंद्रे ( Innovation Centres ) इत्यादींचा देखील समावेश असेल. जमीन व इमारत वगळून प्रकल्प मूल्याच्या ५० टक्के, जास्तीत जास्त रु.२५.०० कोटी इतके अर्थसहाय्य अशा संस्थांना देण्यात येईल.

२. ए.आय.सी.टी.इ. (AICTE) द्वारे मान्यता प्राप्त तंत्रज्ञान महाविद्यालये/ मान्यताप्राप्त संशोधन व विकास संस्था यांना अथवा कोणत्याही इलेक्ट्रॉनिक्स (ESDM) उद्योग / उद्योगाशी संबंधित औद्योगिक संघटना, कोणताही इलेक्ट्रॉनिक्स उद्योग घटक वा औद्योगिक संस्थाद्वारे कंत्राटी तत्वावर/ पुरस्कृत संशोधन कार्य दिल्यास, त्यांना आर्थिक सहाय्यता म्हणून सदर प्रकल्पमूल्याच्या ५० टक्के आर्थिक सहाय्य, जास्तीत जास्त रु.५०.०० लाख मर्यादेपर्यन्त एक वेळेस देण्यात येईल.

## ५.२ <u>बाजारपेठ विकासाकरीता मदत :</u>

१. सुक्ष्म, लघु, मध्यम औद्योगिक उपक्रम घटकांना, भारताबाहेर आयोजित करण्यात येणाऱ्या इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांच्या आंतरराष्ट्रीय व्यापार प्रदर्शनामध्ये सहभागी होण्याकरिता भाडे, साहित्य व प्रदर्शित करावयाची सामग्रीच्या एकूण किंमतीच्या ५० टक्के वर्षातून एकदा जास्तीत जास्त रू. ३.०० लाख इतक्या मर्यादेपर्यंत एकूण धोरण कालावधीमध्ये दोन वेळेसाठी सहभागी होण्यास अर्थसहाय्य देण्यात येईल. कोणत्याही घटकाला औद्योगिक संघटनेचा एक भाग म्हणूनच अशा प्रदर्शनांमध्ये सहभागी होता येईल, एकटयाने सहभागी होता येणार नाही. सदर सहाय्य केलेल्या खर्चाच्या परताव्याच्या स्वरुपात असेल. यासाठी सुक्ष्म, लघु व मध्यम औद्योगिक उपक्रम घटकांनी प्रदर्शनात सहभागी झाल्याच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या आत सहाय्य मिळण्यासाठी अर्ज करणे आवश्यक असेल.

२. भारताबाहेरील आंतरराष्ट्रीय प्रदर्शनामध्ये "महाराष्ट्र पॅव्हेलियन" म्हणून सहभागी होण्याकरिता कमीत कमी ५ औद्योगिक घटकांचा समावेश असलेल्या औद्योगिक संघटनांना यासाठीच्या एकूण भाडयाच्या ५० टक्के रू. १०.०० लाख इतक्या कमाल मर्यादेपर्यंत अर्थसहाय्य देण्यात येईल. असे अर्थसहाय्य खर्चाच्या परताव्याच्या स्वरुपात असेल व वर्षातून एकदाच दिले जाईल.

३. औद्योगिक संघटनांना महाराष्ट्रात राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रे / प्रदर्शने आयोजित करण्याकरिता अनुक्रमे रु. १०.०० लाख व रु. २५.०० लाखाच्या मर्यादेत "व्हायेबिलीटी गॅप सपोर्ट" (Viability gap support) म्हणून अर्थसहाय्य करण्यात येईल.

४. औद्योगिक संघटनांना कन्व्हेंन्शन सेंटर / ट्रेड सेंटर उभारण्याकरीता जमिनीचे मूल्य वगळता, प्रकल्प खर्चाच्या ५० टक्के, रु. १०.०० कोटीच्या मर्यादेत अर्थसहाय्य देण्यात येईल.

## ६. <u>इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी</u>

राज्यात इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग क्षेत्राच्या विकासासाठी इलेक्ट्रॉनिक्स विकास निधी राज्य शासनाकडून उभारण्यात येईल. या प्रयोजनासाठी रू. ५०.०० कोटी इतका प्रारंभिक मूळ निधी (कॉर्पस) ठेवण्यात येईल. हा निधी म्हणजे निधींचा निधी (Fund of Funds)असेल. या निधीची गुंतवणूक व्यावसायिक गुंतवणुकदार (Professionally

Managed)असलेल्या Early Stage Angel Funds आणि Venture Funds यांचेमार्फत करण्यात येईल.

## ७. मनुष्यबळ विकास

कोणत्याही उद्योगास यशाची किल्ली ही योग्य कौशल्य व योग्य ज्ञान असलेले मनुष्यबळ होय. आणि इलेक्ट्रॉनिक्स उद्योग याला अपवाद नाही. शासन इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांसाठी (ESDM) कुशल मनुष्यबळ समूह ( pool of skilled manpower) निर्माण होण्यासाठी खालील उपाययोजना करेल.

१. औद्योगिक प्रशिक्षणसंस्था (ITI) / तंत्रज्ञान / व्यावसायिक शाळा यांचा दर्जा उंचावून व्यक्तींना ऑपरेटर स्तरावरील प्रशिक्षण देण्याकरिता, सुयोग्य पायाभूत सुविधा निर्माण करण्यात येतील.

२. सार्वजनिक - खाजगी – भागीदारीच्या माध्यमातून इलेक्ट्रॉनिक्स उत्पादनांच्या विक्री नंतरच्या आधारभूत सेवा सुविधा देण्याविषयक अल्पमुदतीचे अभ्यासक्रम व प्रशिक्षण संस्था, सुरू करण्यास उत्तेजन देण्यात येईल.

३. तांत्रिक शिक्षण क्षेत्रात इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगक्षेत्रामध्ये आवश्यक असलेले अद्ययावत तंत्रज्ञानाचे शिक्षण देण्यासाठी क्षमता निर्माण करणे व त्यादृष्टीने तांत्रिक अभ्यासक्रम तयार करण्याची प्रक्रिया निरंतर सुरू ठेवण्यात येईल.

४. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग घटकांच्या अंतर्गत (Inhouse) प्रशिक्षण सुविधा बाहेरील उमेदवारांना प्रशिक्षण देण्याकरीता वापरता येईल.

## ८. संबंधित कायद्यांचे सुलभीकरण करण्यासाठी पुढाकार घेणे

**८.१** इलेक्ट्रॉनिक्स उद्योगांना खालील सवलती देण्यात येतील.

१. कामाचे तास कामाच्या पाळया आणि महिलांना नोकरीवर ठेवण्यासंदर्भातील दुकाने व आस्थापना अधिनियमातील तरतुदी शिथिल करणे. तथापि शिफ्ट मध्ये रात्री उशीरापर्यंत काम करण्याचा निर्णय महिलांचा राहील. शिवाय अशा महिलांच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित व्यवस्थापनांची राहील.

२. प्रत्यक्ष हजेरी व वेतन विषयक अभिलेख नोंदवहया ठेवण्यापासून सूट देणे.

३. कामगार विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १३ अधिनियमांखालील वार्षिक विवरणपत्रे स्वयंप्रमाणित आणि एकत्रित दाखल करण्याचा पर्याय देणे.

**८.२** इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योग (ESDM) हे 'महाराष्ट्र अत्यावश्यक सेवा आणि देखभाल कायदा - २०११' या अधिनियमा अंतर्गत अत्यावश्यक सेवा म्हणून घोषित केले जातील. इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांना अत्यावश्यक सेवांच्या यादीमध्ये समाविष्ट करण्याकरीता शासन सदर अधिनियमात योग्य ती सुधारणा करेल.

**८.३** इलेक्ट्रॉनिक्स घटकांमधील कर्मचाऱ्यांशी संबंधीत कामगार कायद्यांद्वारे आवश्यक करण्यात आलेले अभिलेख इलेक्ट्रॉनिक स्वरूपात ठेवण्यास तरतुद करण्यात येईल. तसेच कामगार विभागाचे त्या दृष्टीने संगणकी- करण झाल्यास विवरणपत्रे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात स्विकारण्यात येतील.

**८.४** १०० पेक्षा कमी कर्मचारी असलेल्या आणि उत्पादन प्रक्रियेतून सांडपाणी प्रसृत न करणाऱ्या इलेक्ट्रॉनिक्स घटकांना महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडून मान्यता घेण्यापासून सूट देण्यात येईल. अशा घटकांना, इलेक्ट्रॉनिक कचरा, वापरलेल्या बॅटऱ्या आणि उपयोगात आणलेले तेल यांसारख्या ई-कचऱ्याची विल्हेवाट लावल्याविषयी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाला वार्षिक विवरणपत्र सादर करणे आवश्यक असेल. अशा उद्योग घटकांना स्थानिक सांडपाणी व्यवस्थेशी जोडणी घेणे आवश्यक राहील.

**८.५** विशेष आर्थिक क्षेत्रातील (एसईझेड) घटकांसाठी कंत्राटी कामगार अधिनियमाअंतर्गत देण्यात आलेली शिथिलता विधानमंडळाच्या मंजुरीच्या अधीनतेने, सर्व इलेक्ट्रॉनिक्स घटकांनादेखील देण्यात येईल.

**८.६** विद्युत पुरवठया संदर्भात इलेक्ट्रॉनिक्स उद्योग हे अखंडीत प्रक्रिया उद्योग म्हणुन समजले जातील व इलेक्ट्रॉनिक्स उद्योग समूहाकरिता स्वतंत्रपणे उभारलेल्या अतिरिक्त फिडरद्वारे आठवडाभर २४ तास अखंडितपणे वीज पुरवठा करण्यात येईल.

**८.७** इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांना राज्यशासनाच्या विविध विभागांच्या मान्यता मिळण्यासाठी एक खिडकी योजना सुरू करण्यात येईल.

**९.** या धोरणांतर्गत सवलतीस पात्र ESDM उत्पादनांची/सेवांची यादी केंद्र शासनाच्याअधिसूचित केलेल्या इलेक्ट्रॉनिक्स रचना प्रणाली व उत्पादक उद्योगांकरीताच्या, सुधारीत विशेष अनुदान योजना (Modified Special Incentive Scheme : M-SIPS) अंतर्गत यादीप्रमाणे राहिल. केंद्र शासन वेळोवेळी सदर मध्ये जो बदल करेल त्याप्रमाणे सुधारीत करण्यांत येईल.

*******

सोबत - परिशिष्ट -3

# Hi-Tech LCD/LED Display Panel Fab Policy for the State of Maharashtra

**Industries, Energy & labour Department**
**Government of Maharashtra**

## 1. Vision & Objective

1.1. This policy aims to develop large scale Hi-Tech Liquid Crystal Devices / Light Emitting Diode Display Panel Fabrication including Thin Film Transistor Display Panel Fabrication ('FAB') in order to encourage sustainable industrial growth in the backward regions for the State of Maharashtra.

1.2. To increase the flow of investments in the state towards making India and the state self-sufficient in electronics manufacturing

1.3. To maximize direct and indirect employment opportunities.

1.4. To develop state of the art industrial infrastructure confirming to international standards in lessor developed regions of the state.

1.5. Creation of a holistic business environment in order to attract and promote business trade, investment and entrepreneurship in the sector.

1.6. Augmentation of Gross State Domestic Product of Maharashtra.

## 2. Strategy

2.1. Providing fiscal incentives and world class infrastructure facilities conforming to the international standards for promoting the Hi Tech Electronic manufacturing FAB Sector including basic infrastructural facilities like land, uninterrupted power and water supply to the door steps, sewage and water disposal, construction of roads and sea port connectivity.

2.2. Providing infrastructure facilities to Captive Vendors who will put up investment entirely for the purpose of industries set up in the LCD Panel FAB Sector.

2.3. Facilitation of efficient transportation of raw materials and finished goods by providing transport, warehousing and allied infrastructure.

2.4. The establishment of a free trade, Dry Port and warehousing zone for raw materials, components required for FAB units to facilitate easy access thereof within the State.

## 3. Definitions

3.1. Eligible Unit

An Eligible Unit

(i) means a new Unit which satisfies the criterion set-out in this Policy;
and

(ii) Includes Unit set-up by Captive Vendors for manufacturing of key raw materials for FAB such as Glass Substrate, Polariser, Diffuser, Color Filter, Driver IC, and Back light, Optical Film, Gases and Chemicals etc. particularly with reference to main Unit.

(iii) means a new unit, engaging in fab activities as covered under M-SIPS Policy of Government of India.

3.2. New Unit

A New Unit shall mean a Unit which satisfies the following conditions:

i) It is not an Existing Unit; and

ii) It is not formed as a result of re-establishment, mere change of ownership, change in the constitution, reconstruction or revival of an Existing Unit.

iii) Located in Vidarbha & Marathwada region of Maharashtra.

iv) Unit shall mean a New Unit set-up to manufacture to all FAB activities covered under M-SIPS Policy of Government of India. such as , Liquid Crystal Devices/Light Emitting Diode ('LCD/LED') Display Panels used for applications such as Televisions, Smartphones, Tablets, and Monitors etc. including Thin Film Transistor Display Panels or semi conductors with a initial minimum investment of INR 5,000 Crores as qualifying condition with minimum total investment of INR 10,000 Crores in 10 years

3.3. Captive Vendors

The term Captive Vendors shall mean any vendor who invests in a facility located in vicinity of FAB premises for the purpose of supplying key raw materials such as Glass Substrate, Polariser, Diffuser, Color Filter , Driver IC , Back light, Optical Film ,Gases and Chemicals etc used for manufacturing of LCD Panels as well as semi conductors.

3.4. Fixed Capital Expenditure ( Capital Investment )

The term '~~Gross~~ Fixed Capital Expenditure ( Capital Investment)' shall mean and include the expenditure on creation of assests / activities admissible as per the M-SIPS Policy of Government of India extended to FAB Units.

## 4. Incentives for Eligible Units

4.1 Capital Subsidy

4.1.1 A capital subsidy of 10% on the – Fixed Capital Expenditure (Capital Investment) made by the eligible units as per the criteria defined by Government of India under the M-SIPs Policy extended to FAB Units. Not less than Rs.10,000 Crore, Capital investment , over the investment period (i.e. 10 years). made by the Eligible fab Units as included in the M-SIPs Policy of Government of India shall be eligible to get subsidy under this policy, However if the investment of Unit Exceeds Rs. 10,000 Crore , Cabinet subcommittee is Empowered to take decision to grant additional capital subsidy up to 5% . –This subsidy shall be applicable only to the new Units and captive vendors established within the Policy time frame within the regions of Marathawada & Vidharbha Region. .

4.1.2 This Subsidy shall be in the form of reimbursement of Project Expenditure ,which shall be linked to release of capital Subsidy by Govt. of India under M-SIPS Policy i.e. the unit after getting central govt subsidy under MSIPS policy on the basis of qualifying stage there under , and thereafter crossing the threshold marks / qualifying stage earmarked by state Govt. in such condition only the eligible unit will be considered for Capital subsidy to be released. ;

In mean while project on the basis of its investment, shall be considered as a Mega or Ultra mega project and will be eligible to get the Industrial Promotion Subsidy under the Package scheme of Incentives of the State Govt. .

4.1.3 FAB unit, making qualifying investment, to the tune of Rs.5000 crore will be eligible for 50% of the eligible Capital subsidy. However such subsidy shall be linked to release of capital Subsidy by Govt. of India under M-SIPS Policy i.e. the unit after getting central govt subsidy under MSIPS policy on the basis of qualifying stage there under , and thereafter crossing the investment threshold of Rs. 5000crore the eligible unit will be considered for Capital subsidy to be released. ;

When the investment of the unit reaches qualifying investment of Rs 10000 Crore, remaining 50% of the eligible Capital subsidy will be released along with the capital subsidies eligible for investment of 10000 crore . However such subsidy shall be proportionate to release of capital Subsidy by Govt. of India under M-SIPS Policy. For investments beyond Rs. 10,000 crore capital subsidy release will be linked to release of capital subsidies by Government of India under M-SIPS.

4.2 Land

4.2.1 Contiguous Land (as per requirement of the Eligible Unit) shall be made available at a subsidized rate in a developed MIDC Industrial area, of Vidarbha & Marathwada at mutually agreed rate, as per the prevalent policy of the MIDC.

4.2.2 The Land made available to the Eligible Units under this policy shall be provided on a long term-lease,

4.3 Incentives Related To Power

4.3.1 The Eligible Unit will be provided 100% exemption on Electricity Duty for a period of 15 years from the date of commencement of their production.

4.3.2 The - MIDC & MSEDCL will provide uninterrupted and adequate power supply for the Eligible Unit from Stable Double Grid Fixed connectivity for a period of 15 years from the date of commencement of their production.

4.4 Incentives Related to Water Supply

4.4.1 The - MIDC will provide uninterrupted and adequate water supply for the Eligible Unit as per the prevalent policy of the MIDC

4.5 Value Added Tax (VAT)/ Central Sales Tax (CST) Incentive

4.5.1 Reimbursement of 100% VAT paid by the Eligible Unit including input tax credit for a period of 15 years from the date of commencement of commercial production paid on intra-state sale of the goods.

4.5.2 Reimbursement of 100% CST paid by the Eligible Unit for a period of 15 years from the date of commencement of commercial production paid in the course of inter-state sale of goods.

4.5.3 The corresponding benefit shall be extended to the Eligible Unit for the specified period in case the existing tax laws are replaced by the Goods and Services Tax laws.

4.6 Incentives on Training and Skill Development

4.6.1 The Department of the Skill Development of the state government will support the cost of internal training and skill development for employees of the Fab unit as per policy of skill development department. .

4.7 Stamp Duty - Exemptions

4.7.1 100% exemption of Stamp duty - for acquiring/lease of any immovable property required for establishment of the Eligible Unit.

4.7.2 100% exemption of Stamp duty - for mortgages and hypothecations for obtaining loans.

4.8 Infrastructure Facilities to be made available by the - MIDC as per prevailing policy of the Corporation..

4.8.1 Facilitation of construction of Dedicated uninterrupted power supply through 400/220 kV substation through double circuit transmission Grid connectivity build next to the Fab door steps by the MIDC and MSEDCL.

4.8.2 Facilitation of construction of Dedicated Water treatment plant and pipeline from the Dam to the Fab Door steps Unit as per the prevalent policy of the MIDC

4.8.3 Facilitation of construction of Effluent and sewage treatment plant and infrastructure of adequate capacity to handle the effluents from the unit.

4.8.4 Facilitation of construction of Build and maintain the storm water drain channels / pipes around the property to evacuate the storm/rain water from the Site.

4.8.5 Facilitation of construction of quality roads from the Eligible Unit to the nearest sea port for meeting the necessary transportation and logistics needs of the Eligible Unit.

4.8.6 Facilitation of construction of Dry Port (used as transshipment of sea cargo to inland destinations Facility)at the nearest point of the Industrial area in collaboration with Government of India

4.8.7 Facilitation of construction of Dedicated Fire Station with chemical fire-fighting capability

4.8.8 Facilitation of construction of Providing housing and related Social infrastructure such as international schools etc. for the employees of the Fab Units in close proximity of the Eligible Unit

4.9 Benefits to Captive Vendors

4.9.1 Up to 20% Investment made by Captive Vendors can be considered for Capital subsidy.

4.9.2 30% of the land located near the Eligible Unit shall be reserved for the Captive Vendors by the MIDC.

4.10 Relaxation of Labour Law Compliance

4.10.1 The Eligible Unit shall be permitted for self certification of the registers and forms as contemplated under various following Acts viz. Payment of Wages Act, Minimum Wages Act, Employees State Insurance Act, Payment of Gratuity Act, Maternity Benefit Act, Equal Remuneration Act, Water & Pollution Act, Employment Exchange Act, Factories Act, Employees' Provident Fund & Misc, Provisions Act, Contract Labour (Regulation and Abolition) Act and shall also be allowed to maintain unified register and record instead of maintenance of different registers and records under different Labour Acts.

4.10.2 The relevant provisions of certain labour laws shall be relaxed for the Eligible Unit so as to allow women 24 X 7 operations with 3 shifts per day.

4.11 Statutory Clearances for the Eligible Units

4.11.1 State government shall ensure obtaining all basic statutory clearances for the Eligible Units from the appropriate authorities like Land, Layout approval and Environmental Clearances from Ministry of Environment & Forests, Government of India and other statutory bodies for starting the Fab construction, operations and commercial through single window clearance system

## 5 Period of Investment

5.1 The investment period for Eligible Units shall be 10 years. The investment period will be counted from the date of submission of application to the State Government/the concerned Ministry / Department there-under by the Eligible Unit.

## 6 Period of Operation

6.1 This Policy shall come into force with effect from the date of issuance of Policy GR and shall remain in force for a period of FIVE years - Only those Eligible Units which obtain the approval and eligibility during the operative period of this Policy shall be eligible for incentives.

## 7 Policy Implementation Guidelines

.

7.1 The fiscal and other benefits as detailed in Paragraph 4 of this Policy shall be available in conjunction with the fiscal and other benefits as contained in the Packaged Scheme of Incentives, 2013 issued by the State of Maharashtra or any prevailing Packaged Scheme of Incentives.

7.2 The fiscal and other benefits as outlined in Paragraph 4 of this Policy shall be available in addition to any other fiscal and other benefits received/receivable from the Central Government under any scheme.

7.3 The benefit of this Policy shall be extended to all Eligible Units , qualified for incentives under the M-SIPS policy of the Government of India, established during the policy period .

********